

**प्रकाशक**
सौ. शुभदा ज्ञानेश्वर मुळे
२२५/३ पांडुरंग भुवन
ले.ज.रोड
शिवाजी पार्क, माहीम ४०००१६
फोन : ४३००४०३



**प्रकाशन क्रमांक : १२५**

**प्रकाशन दिनांक**
३ डिसेंबर १९९५
''रौप्य महोत्सवी वर्ष''

**मुखपृष्ठ व आतील सजावट**
अनिल दाभाडे

**अक्षरजुळणी**
अभिषेक टाईपसेटर्स
पुणे : ४११०३०.

**मुद्रक**
प्रमोद वि. बापट
स्मिता प्रिंटर्स
१२१०, सदाशिव पेठ,
पुणे : ४११०३०.

**मूल्य : रु. ५० /– फक्त**

ISBN - 81 - 7424 - 014 - 4



आनंदी जीवन जगणारे

आनंदयात्री आनंदऋषी

ह्यांना अर्पण

**जगदीश**



## अनुक्रम



# १. हुशार कावळा

एक होता कावळा. त्याचे सगळे जातभाई त्याला मान द्यायचे त्यामुळं तो कावळ्यांच्या प्रजेचा राजाच झाला होता. अडीअडचणीसाठी सल्लामसलत करायला सगळी कावळ्यांची जमात त्याच्याकडे यायची. त्याला हा मान मिळण्यामागे एक घटना कारणीभूत होती, तेव्हा तो हुशारीनं वागला होता, म्हणूनच सगळ्या कावळ्यांना तो खूप खूप अक्कलवान वाटत होता.

कोणती होती ती घटना ? ऐका हंऽऽ

त्या दिवशी तो सकाळपासनं चारापाण्यासाठी नेहेमीसारखा बाहेर पडला. आकाशात उंच भरारी घेतली. उन्हाळ्याचे दिवस होते. दुष्काळाची लक्षणं दिसत होती. नद्या नाले आटलेले होते. कावळ्याला फिरता फिरता तहान लागली, म्हणून तो पाणी शोधू लागला. पण कुठेही त्याला पाण्याचा टिपूस दिसेना. त्याची तहान वाढायला लागली. त्याच्या घशाला कोरड पडू लागली. पाण्यासाठी त्याचा जीव व्याकुळ होऊ लागला. एवढा की, त्याला पंख फडफडवून पाणी शोधण्याचं त्राणही नाहीसं होतंय की काय अशी भीती वाटू लागली. जीवाच्या करारानं तो पाणी शोधू लागला.

उंचावरून त्यानं चहूकडे नजर फिरवली. कावळ्याचीच नजर ती! त्याला एक पाण्याची कळशी दिसली. त्याबरोबर त्यानं कळशीकडे झेप घेतली. तिच्या काठावर येऊन बसला. आणि आत नजर वळवली.

कळशीत थोडेसेच पाणी होते. काठावरून वाकूनसुद्धा त्याची चोच पाण्यापर्यंत पोहोचत नव्हती.

''अरेरे! एवढ्या जवळ पाणी असूनही मी पिऊ शकत नाहीय.'' असं म्हणत तो काय करावं या विचारातच कळशीच्या काठावर बसला.

त्यानं काठ पायात घट्ट पकडून खाली वाकायचा प्रयत्न केला. त्या प्रयत्नात चोच पाण्यापर्यंत तर पोहोचली नाहीच पण त्याच्या पायाची पकड सुटून तो कळशीच्या आत पडणारच होता. प्रसंगावधान राखून तो उडाला म्हणून थोडक्यात बचावला. तहानेनं व्याकूळ झाल्यामुळं पुन्हा तो कळशीच्या

काठावर येवून बसला.

पाणी तर मिळालं होतं पण पिता येत नव्हतं. हातातोंडाशी आलेला घोट जातोय की काय असं कावळ्याला वाटायला लागलं होतं. दुसरा प्रयत्न म्हणून त्यानं कळशीच उपडी करण्याचा प्रयत्न केला पण कळशी खूपच जड होती. ती काही उपडी होईना.

गरज ही शोधाची जननी असते असं म्हणतात
हेच खरं. विचार करता करता त्याला आठवलं. ''सकाळी आपण जिथं भात खायला गेलो होतो. त्या घरातला मुलगा बाहेरच मोठ्या टबात आंघोळीला बसला होता. आपण भात खात असतानाच तो टबात बसला. त्याबरोबर त्यातील पाणी उसळी मारून वर आलं होतं त्या आवाजानंही आपण घाबरलो होतो. आपण भाताची शीतं वेचत असताना त्या मुलानं, ''पदार्थ जागा व्यापतात आणि एखादा पदार्थ पाण्यात टाकला असता तो त्याच्या आकारमानाइतकं पाणी विस्थापित करतो.'' असं काहीसं म्हटल्याचं आठवताच त्याचा तो कसलातरी प्रयोगच होता जणू. तोच प्रयोग आपण करून बघायला काय हरकत आहे. शेवटी शक्तीपेक्षा युक्ती श्रेष्ठ हेच खरं.

मग कावळ्यानं जवळच पडलेला एक दगड उचलला आणि पाण्याच्या कळशीत टाकला. तो दगड पाण्यात बुडाला आणि पाणी थोडं वर आलं.

''खरंच की, त्या मुलानं सांगितलेलं वैज्ञानिक सत्य आहे. पाण्यात दगड टाकल्यावर तो त्याच्या आकारमानाइतकी जागा व्यापणारच. अर्थातच पाण्याला वर येण्याशिवाय दुसरा मार्गच नाहीय.'' असं स्वत:शी पुटपुटत तो हुरुपानं कामाला लागला. थोडा वेळ त्याला कंठशोष पडलाय हेही तो विसरला. उत्साहानं एकेक दगड आणून कळशीतील पाण्यात टाकायला लागला. तसंतसं पाणी वरवर येऊ लागलं. कळशी दगडानं जसजशी भरत चालली तसतशी पाण्याची पातळी चढू लागली.

शेवटी पाणी पुरतं वर आलं. त्याबरोबर कावळ्यानं चोच पाण्यात बुडवली. पाण्याचा गारगार स्पर्श होताच त्याचा थकवा एकदम नाहीसा झाला. त्यानं आपली तहान भागवली आणि आनंदानं फिरायला निघाला.

ही घटना जेव्हा साऱ्या कावळ्यांना कळली तेव्हापासून कावळे त्याच्या हुशारीला मान देवू लागले. कारण हा कावळा काळाच्या पावलांवर पावलं टाकून चालणारा होता.





# २. कोल्हयाला द्राक्षं आंबट

एकदा पृथ्वीवरचा कोल्हा गेला चंद्रावर. चंद्रावरील कोल्हयाने त्याचे आनंदाने स्वागत केले.

चंद्रावरील अवकाशतळावर उतरल्या उतरल्या पृथ्वीवरच्या कोल्हयाला हलकं हलकं वाटायला लागलं. चालता येईना. तो दुडक्या चालीनं चालत होता. त्याला थोडसं अवघडल्यासारखं झालं खरं. पण तो मनात म्हणाला, ''कदाचित प्रवासाचा क्षीण आलाय त्यामुळे अंग आंबलय म्हणून पाय जरा आखडले असतील झालं.''

चंद्रावरचा कोल्हा त्याचं स्वागत करत म्हणाला, ''ये मित्रा, तू आलास बरं वाटलं. अरे, पृथ्वीवरच्या माझ्या बांधवांची मला किती आठवण येते म्हणून सांगू. मला राहावलं नाही म्हणून तर तुला निरोप पाठवला बरं. प्रवासाचा शीण आला असेल तुला. तेव्हा थोडी विश्रांती घे. मग तुला चंद्राची सफर करवतो.''

संध्याकाळी फिरता फिरता वाटेत कोल्होबाला एक द्राक्षाच्या वेलीचा मंडप दिसला. वेलीला खूप खूप द्राक्षे लागली होती. घडच्या घड लोंबत होते. द्राक्षेही खूप छान, छान दिसत होती. हिरवी हिरवी गार-टपोरी - रसाने भरलेली - हवीहवीशी वाटणारी. खावीशी वाटणारी, मनाला मोहवणारी.

पृथ्वीवरच्या कोल्हयाला ती द्राक्षे पाहून आनंद झाला. पण त्याने तिकडे चक्क दुर्लक्ष केलं.

चंद्रावरच्या कोल्हयाने त्याला विचारलं, ''कारे, ही द्राक्षाची वेल बघून तुला आनंद नाही झाला?''

''झालाय रे, पण काय उपयोग लाळ गाळून? तोंडाला थोडीच लागणार आहेत ती आपल्या?''

''पृथ्वीवरचा दणका आठवलेला दिसतोय. तिथं तू उड्या मारून मारून थकलास. पण द्राक्षं काही मिळाली नाहीत तुला म्हणून त्यांना आंबट म्हटलंस. पण चंद्रावरील गोष्ट वेगळीय. ही द्राक्षं खरंच रसभरीत आणि गोऽड आहेत. उडी तर मारून बघ.''

''नको रे बाबा. उगाच हात दाखवून अवलक्षण कशाला करून घ्या आणि तुझ्या इथं पाहुणा बोलावून माझी फजिती करायचा विचार आहे का तुझा?'' पृथ्वीवरच्या कोल्हयानं विचारलं.

''नाही रे बाबा. मी तर तुझा पाहुणचारच करतोय. पण तुझी शंकाही खरीय. दुधानं तोंड पोळलं की माणूस ताकही फुंकून पितो. तसं झालं तुझं. खरं तर तुला द्राक्षं आवडतात म्हणूनच मी या बाजूला फिरायला घेऊन आलो तुला. काही काळजी करू नकोस. उडी मारून तर बघ.'' चंद्रावरच्या कोल्हयानं दिलासा दिला.

साशंक मनानं कोल्हयानं उडी मारायचा पवित्रा घेतला. पृथ्वीवरची उडी जोर लावूनही उंची कमीच पडली होती, हे आठवून त्यानं अंगात असलेला सगळा जोर एकवटून उडी मारली. तो



काय, त्याची उडी एवढी उंच गेली की त्याला क्षणभर वाटलं, आपण पक्ष्यासारखं उडतोय. द्राक्षाच्या वेलीचा मंडप पार खाली दिसू लागला आणि तो आकाशात! आपली उडी एवढी उंच जावू शकते यावर त्याचा विश्वासच बसेना. तेवढ्यात तो धपकन खाली पडला. द्राक्षं तर तोंडात आली नाहीच, पण सपाटून मार मात्र लागला. कसाबसा धडपडत तो उभा राहिला आणि चंद्रावरच्या कोल्हयाकडं रागारागानं पाहू लागला.

तेव्हा त्याचा राग शांत करत चंद्रावरचा कोल्हा म्हणाला, ''उडी मारायला तू चुकलास बघ. अरे, ही उडी चंद्रावरची आहे, पृथ्वीवरची नाही.''

''त्यानं काय फरक पडतोय?'' धुसफुसत पृथ्वीवरचा कोल्हा म्हणाला, आपली फजिती झाल्यामुळं तो दुखावला गेला होता.

''मोठाच फरक पडतो तर! हे बघ, चंद्रावरचं गुरुत्वाकर्षण पृथ्वीच्या एकषष्ठांश आहे. त्यामुळं तू जर एक मीटर उंचीची उडी मारलीस तर ती इथं सहा मीटर उंचवर जाते. तुला हा अंदाज नसल्यामुळं तू पृथ्वीवर जशी उडी मारलीस तशीच इथं मारल्यामुळं तू तर सरळ आकाशातच झेपावलास की.''

''तरीच मला चंद्रावर आल्या आल्या हलकं हलकं वाटत होतं. शेवटी काय, तर ही द्राक्षंही माझ्यापुरती आंबटच आहेत म्हणायची.'' पृथ्वीवरच्या कोल्हयानं स्वत:च्या मनाची समजूत काढत आपली फजिती दडवायचा प्रयत्न केला आणि चंद्रावरच्या कोल्हयाबरोबर पुढचा फेरफटका सुरू केला.

◆



# ३. कावळा आणि कोल्हा



एक होता कावळा. फारच हुशार पण तेवढाच लबाडही. नेहमी लबाडी करूनच तो आपलं पोट भरायचा.

एक म्हातारी कोळीण होती. मासे विकून जे मिळेल त्यावर ती आपली गुजराण करत असे. नेहमीप्रमाणे ती मासे विकत बसली होती. हा कावळा तिथं गेला. माशांच्या टोपलीच्या जवळच बसला आणि कावऽऽ काव करू लागला.

''अरे हाड हाड'' करत म्हाताऱ्या कोळीणीनं हात उगारला.

पण कावळा काही उडेना. कावऽऽ काव करणं सोडेना. त्याच्या कावऽऽ कावने म्हातारीचे कान किटले. शेवटी गुडघ्यावर हात ठेवून म्हातारी उठली अन् त्याला मारायला धावली. टोपलीपासून जरा दूर गेली तोच कावळ्यानं टोपलीकडे झेप घेतली. मोठी मासोळी चोचीत धरली आणि दूर दूर धूम ठोकली.

''नेलीन् मेल्यानं माझी एक मासोळी.'' स्वत:शीच बडबडत म्हातारी पुन्हा जागेवर येवून चडफडत बसली.

कावळा दुसऱ्या झाडावर बसून कोळणीकडं पाहत मस्तीनं मनात म्हणाला, ''कशी जिरवली! कशी जिरवली!''

त्याला वाटलं, आपण किती हुशार! आपण किती चतुर! म्हातारीला कसं हातोहात फसवलं. त्याला स्वत:च्या अकलेचा गर्व वाटू लागला. त्यामुळे तो शेफारून गेला. चोचीतली मासळी खायलाही विसरला. मनातल्या मनात आपल्या हुशारीचे मांडे खाऊ लागला.

नंतर तो त्या झाडावरून उडाला अन् रानात गेला. मस्त हिरव्यागार झाडावर आपल्याच मस्तीत बसला. पण तो एकटा नव्हता. त्या झाडाखाली एक कोल्हा होता. त्याचं कावळ्यावर लक्ष होतं. त्याला बारकाईनं न्याहाळत कोल्हा मनाशीच म्हणाला, स्वारी फारच खुशीत दिसतेय. आपल्याच अकलेवर भलताच खुश दिसतोय. आताच संधी आहे. हा कावळा स्वत:ला शहाणा समजतोय तेवढ्यात याला हरबऱ्याच्या झाडावर चढवायला हवा. हा शहाणा असेल तर मी सवाई शहाणा आहे म्हटलं. याला पुरता मामा बनवतो आणि ही मासळी माझ्याच पदरात पाडतो.

असा विचार करीतच कोल्हा जरा पुढं सरकला, कावळ्याला हाक मारत मधाळ स्वरात म्हणाला, ''कावळेमामा नमस्कार. तुम्ही खरंच किती सुंदर दिसता हो. तुमचे पंख किती छान! कसे काजळासारखे चमकदार! आणि छाती तर गरुडासारखी भरदार! तुमची नखं कशी भाल्यासारखी टोकदार!''



आपली स्तुती ऐकून कावळ्याला आणखीनच गर्व चढला. तो तुच्छतेनं कोल्ह्याकडं पाहायला लागला. कोल्हयाला तेच हवं होतं. त्याला माहीत होतं की, कावळ्यावर चाल करून, उडी मारून काही साधणार नाही. माझी उडीही पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षणामुळं जास्त उंच जावू शकणार नाही. पण याला पुरता मामा बनवून त्याच्या चोचीतनं तो मासा मात्र गुरुत्वाकर्षणामुळंच सरळ माझ्या तोंडात पडू शकेल. कारण सगळेच पदार्थ न्यूटनच्या गुरुत्वाकर्षणाच्या नियमानुसार जमिनीवरच पडणार, जशी झाडावरची फळं जमिनीवरच पडतात.

कोल्हयाचं विचारचक्र व्यवस्थित चालू होतं. शेरास सव्वाशेर झाल्याशिवाय काम भागणार नव्हतं. शास्त्रीय ज्ञानाची युक्तीच त्याच्या कामी येणार होती.

कोल्हा आणखीनच गोड भाषेत त्याची स्तुती करू लागला, ''अहाहा! काय ती तुमची बाकदार चोच! मला खात्री आहे जसं तुमचं रूप तसेच तुमचे गुण असणार. तुमचा आवाजही नक्कीच सुंदर असणार. तुम्ही सुरेल स्वरात ताना मारत असणार. हो की नाही? मग मला आज जरा गाऊन दाखवा ना! फार दिवसापासून तुमचं गाणं ऐकायचं मनात होतं. आज ती संधी चालून आलीय बघा. खरंच गाऽनाऽऽ.''

कावळा आधीच चढला होता. त्यात ही स्तुती मग काय विचारता! त्याचा पुरता खुळोबा झाला. त्याला सारे खरेच वाटले. तो एकदम खुश झाला. आनंदाने, मस्तीने पंख फडफडवू लागला. माना वेळावू लागला. त्यातच त्याला गाण्याची उर्मी आली. चोचीतल्या मासळीचा विसर पडला. त्याने सूर लावण्यासाठी आऽ वासला.

त्याबरोबर चोचीतील मासळी निसटली. खाली पडली. जमिनीवरच्या कोल्हयानं आऽऽ वासलाच होता. ती मासळी सरळ त्याच्या तोंडात पडली. त्याने ती झटकन् मटकावली. कसा मामा बनवला अशा मिस्किल डोळ्यानं कावळ्याकडं पाहत कोल्हा निघून गेला.

◆



# ४. बैल आणि बेडकी



पावसाळ्याचे दिवस होते. जागोजाग पाण्याची डबकी साचली होती. अशाच एका डबक्यात एक बेडकी राहत होती. तिने खूप पिल्लं घातली. या मोसमात मायलेकरे मोठ्या आनंदाने राहत होती.

असेच मजेत दिवस जात होते. एक दिवस बेडकी पोहून परतली तेव्हा तिला तिची सारी पिल्लं घाबरून एका कोपऱ्यात थरथरत असलेली दिसली. कुणाच्याही तोंडून आवाज निघत नव्हता. बेडकी त्यांच्याजवळ गेली. मायेनं चौकशी केली. तेव्हा त...त..प..प.. करीत एक पिल्लू म्हणाले,

''आई, आज आम्ही एक भला मोठ्ठा राक्षस पाहिला. तो आभाळाएवढा प्रचंड होता. त्याच्या डोक्यावर शिंगे होती. मागे झुपकेदार शेपूट होते. खुरांनी माती उकरत होता तो. नाकाने फुऽस फुऽस करत होता. त्यामुळं गवत सोसाट्याच्या वाऱ्यानं वाकावं तसं वाकत होतं. डोक्यानं टकरा घेत होता आणि तोंडानं डरकाळ्या फोडत होता.''

''आणि किनई आई'', धीर चेपून दुसरं पिल्लू म्हणालं, ''तो अस्सा जोरानं धावत आला आपल्या डबक्याकडं की आम्हाला वाटलं आता आम्ही त्याच्या पायाखालीच चिरडणार. शिताफी करून आम्ही टुणकन उड्या मारून या खोबणीत बसलो म्हणूनच बचावलो. कारण त्या राक्षसाचा पाय डबक्यात पडलाच होता. त्यामुळे पाणी एवढ्या जोरात उसळलं म्हणून सांगू, मी तर त्या पाण्याबरोबर उडालोच. नशीब म्हणून बचावलो.''

तेव्हा बेडकी हसून म्हणाली. ''बाळांनो, अरे तो राक्षस नव्हता. तो तर साधा बैल. तो काही इतका मोठा नसतो. मी मनात आणलं नाही म्हणून. नाही तर मीही बैलासारखी होऊन दाखवीन.''

बेडकीच्या या बोलण्यावर सगळी पिल्लं तिच्याकडं आदरानं पाहायला लागली. आपली आई खरोखरच महान आहे असं त्यांना वाटायला लागलं. पण त्यातलं एक पिल्लू जरा चिकित्सखोर होतं. ते म्हणालं, ''हॅट, शक्यच नाही. कुठे बैल आणि कुठं आपण!''

बेडकीला आपल्या पिल्लांनी आपल्यावर अविश्वास दाखवावा हे काही रुचलं नाही. तिनं आव्हान स्वीकारायचं ठरवलं. ती म्हणाली, ''माझ्यावर अविश्वास दाखवतोस. अरे, तुमच्यापेक्षा चार पावसाळे मी जास्त पाहिलेत. मला वैज्ञानिक सत्य उमगलंय. मीही त्या बैलाएवढी होऊनं दाखवतेच बघा.''

''अग आई, पण ते कसं शक्य आहे. तो एवढा भला मोठा राक्षस आ...''




''तू मला भिवऊ नकोस.'' पिल्लाचं बोलणं अर्धवट तोडत बेडकी म्हणाली. ती आता इरेलाच पेटली होती. ती बेडकांना गर्वानं समजावून देत म्हणाली, ''हे बघा बाळांनो, त्या समोरच्या घरात राहणारा विशाल आहे ना तो नेहमी एक खेळ खेळताना दिसतो. तो फुग्यात हवा भरून फुगा फुगवत असतो. आत हवा जसजशी भरत जाते तसतसा फुगा मोठा होत जातो. याचाच अर्थ आतील हवेचा दाब वाढतो त्यामुळंच फुग्याचा आकार सर्व दिशांनी वाढायला लागतो. त्या दिवशी विशाल फुगा फुगवत असताना या प्रकाराला पास्कलचा नियम म्हणून बडबडत होता. तो म्हणाला, ''बंदिस्त पदार्थावर दाब दिला असता तो सर्व दिशांनी सारख्याच प्रमाणात फरेषित होतो ? आता बघा मी सुद्धा त्याच नियमाप्रमाणे तुम्हाला बैलाएवढी होऊन दाखवते.''

बिचाऱ्या पिलांना आपली आई काय बडबडतेय ते कळलंच नाही. ती एकटक तिच्याकडं गोंधळून पाहत होती.

तेवढ्यात बेडकीनं आपलं पोट फुगवलं आणि विचारलं, ''एवढा मोठा होता काय ?''

पिल्ले म्हणाली, ''नाही, आणखी मोठा.''

मग बेडकी आणखी फुगली. पिल्ले म्हणाली, आणखी मोठा.

बेडकी पुन्हा फुगली आणि पुन: पुन्हा आपलं पोट फुगवतच राहिली. प्रत्येक वेळी पिल्ले म्हणायची, ''आणखी मोठा.''

शेवटी बेडकीची ताकद संपली. ती एवढी फुगली की, तिला याउप्पर फुगणं अशक्य झालं. तिची कातडी प्रचंडपणे ताणली गेली होती. पण ती इरेला पेटली होती. तिनं आणखीन जोर केला आणि फटाऽऽक करून मोठा आवाज झाला. तिचं पोट फुटलं होतं. तिच्याच शब्दात सांगायचं झालं तर, बंदिस्त हवेचा दाब तिच्या शरीरात एवढा वाढला होता की ती फटकन् फुटली फुग्यासारखी आणि मरून गेली. पिल्ले बिचारी पोरकी झाली.







# ५. पंडित आणि बाळकोबा

एक हुशार पंडित होता. नुसताच बुद्धीने हुशार नव्हे, तर चतुर अन् प्रसंगावधानीसुद्धा. एकदा तो प्रवासाला निघाला. रस्ता रानातून जात होता. बरोबर कुणाची संगतही नव्हती. पण भीती ही काय चीज आहे हे पंडिताच्या गावीही नव्हते. त्याचा आत्मविश्वास जबरदस्त होता.

हळुहळू संध्याकाळी झाली. झाडांच्या सावल्या लांबलांब पडू लागल्या. पाखरे घरट्याकडे परतू लागली. रात्र झाली तशी रातकिड्यांचं किर्रऽऽ संगीत सुरू झालं.

त्या रानातून एक बावळट बाळकोबाही घाबरत घाबरत आपल्या गावी जात होता. त्याला पंडित शेकोटी पेटवून बसलेला दिसला. दिवस थंडीचे होते. शरीरात ऊब आणण्यासाठी पंडिताने दोन्ही तळहातांवर फुंकर मारली अन् हातावर हात चोळू लागला. शरीरात थोडी ऊब आली. त्याचे कुडकुडणे थांबले. नंतर त्याने चूल तयार केली. पडशीतून सामान काढले! भांड्यात तांदूळ टाकले, पाणी टाकलं आणि पेज शिजवू लागला. पेज शिजवल्यावर त्यानं ती ताटलीत ओतली. पेज गरमागरम होती. तीतून वाफा निघत होत्या. फुंकर घालून तो पेज निववू लागला.

दुरून बावळट बाळकोबा हे सर्व पाहत होता. त्याला आश्चर्य वाटलं. फुंकर घालून हातावर हात चोळत त्यानं ऊब निर्माण केली अन् तशीच फुंकर घालून त्यानं पेज थंडही केली. हा माणूस एकाच फुंकरीनं पदार्थ गरमही करतो अन् फुंकरीनं पदार्थ थंडही करतो. अजबच आहे. जादूगार दिसतोय हा माणूस. त्याच्या डोक्यात हा विचार आला आणि तो आणखीनच घाबरला. ह्या जादूगारानं आपल्याला पाहिलं तर आपली शंभरी भरलीच. हा जादूने आपली कोंबडी बिमडी करून टाकायचा कदाचित. या विचारानं तो आणखीनच भीतीनं थरथरू लागला. कुठे रात्रीच्या वेळी रानात सापडलो असं त्याला झालं, घरी पोहोचणंही तेवढंच महत्त्वाचं होतं म्हणून तो रात्रीच्या वेळी नाईलाजानं बाहेर पडला होता. रानातच रात्र झाल्यामुळं त्याला पुढे जायची भीती वाटू लागली होती. त्यामुळे तो एका झाडाच्या ढोलीत लपून बसला होता. आता तर ह्या जादूगाराची त्याला भीती वाटू लागली होती. त्याच्या दृष्टीस पडू नये म्हणून तो ढोलीतून बाहेर पडला. आणि सुसाटत पळत सुटला. त्याच्या या धडपडीनं झाडाची पानं सळसळली. काट्याकुट्यांचा आवाज झाला. त्या आवाजाच्या

रोखानं पंडितानं त्याला पाहिलं. त्याला एक माणूस पळताना दिसला. पंडिताला वाटलं, बरी सोबत झाली. म्हणून त्यानं त्याला हाक मारली.

बावळट बाळकोबाला वाटलं, झालं, आता आपण त्याच्या नजरेत. आपली आता लागली वाट. म्हणून तो जोरानं पळायला लागला. पंडिताला वाटलं तो चोरबीर आहे की काय आणि कुठं तरी चोरी करून तर तो पळत नाही ना. अशी त्याला शंका आली अन् पंडित त्याला पकडायला धावला. थोड्याच वेळात पंडितानं त्याला गाठलं.

त्याबरोबर बाळकोबा गयावया करू लागला. ''नका हो माझी कोंबडी करू नका. मी गरीब बिचारा साधा माणूस आहे हो.''

''मग तू मला बघून पळत का सुटलास?''

''तुम्ही जादूगार आहात ना. माझी कोंबडी कराल म्हणून भीतीनं पळत होतो.''

''कुणी सांगितलं तुला, मी जादूगार आहे म्हणून?''

''माझ्या डोळ्यांनी पाहिलंय ना? तुम्ही एकाच फुंकरीत पदार्थ गरम करता आणि थंडही.''

त्याचं हे म्हणणं ऐकून पंडित जोरानं खो-खो हसू लागला. एवढा की त्याला हसता हसता ठसका लागला. बाळकोबाला कळेना हा माणूस असा वेड्यासारखा का हसतोय म्हणून.

हसणं थांबवून बाळकोबाला समजावत पंडित म्हणाला, ''अरे बाबा, ते तर साधं विज्ञान आहे. हातावर हात घासले तर घर्षण निर्माण होतं त्यामुळे तळवे गरम होतात आणि ऊब शरीरभर पसरते. फुंकरीनं तळव्याच्या जवळची हवा ढकलली जाते एवढेच. आणि पेज थंड करताना फुंकर पेजेवरची वाफ दूर सारते. त्यामुळे पेजेचं बाष्पिभवन जलदगतीनं होतं आणि पेज लवकर निवते. हातात जादूबिदू काही नाही. तुझं अज्ञानच तुझा शत्रू आहे. भित्यापाठी ब्रह्मराक्षस म्हणतात ते काही खोटं नाही.''

◆







# ६. ससा आणि कासव

समुद्र किनाऱ्यावर एक गाव होतं. किनाऱ्यालगतच्या गवतात काही ससे राहत असत. भरतीच्या वेळी बरेचदा कासवंही किनाऱ्यावर येत. त्यांच्यापैकी एका कासवाची एका सशाबरोबर मैत्री झाली.

सशाला कासवाची धीमी चाल पाहून ते धूड हळूहळू सरकताना एखादा दगड चालतोय असं वाटत असे. त्याला त्याची गंमतही वाटत असे. तो मात्र दुडूदुडू इकडून तिकडे, तिकडून इकडे गवतात धावत असे.

दोघेही एकमेकांशी सुखदु:खाच्या गोष्टी करीत. बरोबर फिरत. पण या भटकंतीत कासव बिचारे मागे राही. ससा चपळतेनं केव्हाच पुढं निघून गेलेला असे. मग दुरून ससा डोळे लुकलुकवत त्या धिम्या गतीनं चालणाऱ्या कासवाकडे पाहत दुडक्या चालीनं धावतच पुन्हा कासवाजवळ येई. त्याची खूप चेष्टा करी. त्याला डिवचून विचारत राही, ''धावशील का माझ्यासारखा ?''

कासवाला मात्र त्याच्या या डिवचण्याचा कधीही राग येत नसे. तो सारे हसून उडवून लावी. काहीच मनावर घेत नसे.

होता होता दिवस जात होते. सशाचे सारखे डिवचणे चालूच होते. शेवटी ससा फारच डिवचू लागला तेव्हा कासवाने आव्हान स्वीकारायचे ठरवले. हाहा म्हणता बातमी पसरली. सारे ससे जमले. तेव्हा ससोबा आणखीन शेफारला. त्याने कासवास आव्हान दिले, ''हे बघ या गवताच्या शेताडीतून सरळ निघायचे आणि किनाऱ्यावरील वाळूतून पळत पळत सरळ समुद्रात जिथं पाणी किनाऱ्यावर येऊन मिळतं तिथपर्यंत जायचं. आज ओहोटी असल्यामुळं पार आतपर्यंत जावं लागणार आहे. आहे, कबूल ?''

कासव म्हणाले, ''ठीक आहे. चल कर सुरवात.''

''बघ हं. नीट विचार कर. मी तुझ्याभोवती फिरेन. प्रदक्षिणा घालीन तुला. पण तरीही तुझ्या आधीच पोहोचेन. अजून नीट विचार कर.''

कासव काहीच बोलले नाही. ते आपला धीम्यागतीने चालू लागले. सावकाशपणे वाट कापू लागले.

ससा कौतुकाने पाहत होता. कासव पुढे गेले तरी त्याला चिंता नव्हती. त्याला माहीत होतं, शेवटी शर्यत आपणच जिंकणार. ते कासव मात्र गंभीर होते. नेटानं एकसारख्या वेगानं वाट कापत होते.

मात्र सशानं मनावर घेतलं. सुसाट वेगानं निघाला. गवताची शेताडी तर हाहा म्हणता पसार केली. क्षणात नजरेआड झाला. साऱ्यांना वाटले, पोहोचलाच तो. सारे धावत सुटले सशाच्या मागे

गेले.

इकडे कासव बिचारे अजून गवताच्या शेताडीतून वाट काढत चालले होते. खूप मागे राहिला होते. पण काळजी करत नव्हते. चिकाटी धरून चालतच होते. संथ पावले टाकत होते.

ससा पळत पळत उलटा फिरला. कासवाभोवती प्रदक्षिणा घातल्या अन् पुन्हा धूम पळत सुटला समुद्राकडे.

पण अरे, हे काय झाले? किनाऱ्यावरच्या वाळूत त्याला पळता येईना. त्याचे पाय घसरू लागले. पळताना जास्त जोर काढायला लागला. किनाऱ्यावर वाळू तर फार दूरपर्यंत पसरली होती. ससा जेवढ्या जोरानं पायाने रेटा द्यायचा तेवढीच वाळू मागे सरकायची अन् सशाला पळणं अशक्य व्हायचं.

शेवटी जोर काढून काढून ससोबा थकले. त्यानं मागे वळून पाहिलं. कासव गवताच्या शेताडीतून बाहेर पडून वाळूत येऊन चालू लागले होते. ते संथ गतीनं एकसमान वेगानं चालले होते.

ससा मनात म्हणाला, ठीक आहे. अजून कासव मागेच आहे. आपण थकलोच आहोत तर थोडावेळ विश्रांती घेऊ. विचार पक्का होताच ससा झोपी गेला. कासव संथपणे वाट कापत सशाजवळ आले. ससा दमून झोपला होता. कासव मनातल्या मनात हसले. अन् स्वत:शीच पुटपुटत चालू लागले.

सशाला, गवताच्या शेताडीपेक्षा वाळूत पळणं कठीण का आहे हे माहीत नाही म्हणूनच त्याला थकायला झाले. चालणे हा तर साधा न्यूटनचा गतिविषयक तिसऱ्या नियमाचा प्रकार आहे. आपण जमिनीला रेटा देतो त्याची प्रतिक्रिया म्हणून जमीन आपल्याला पुढं ढकलते. पण वाळूत पायांनी रेटा दिल्यावर वाळूच मागे सरकते. त्यामुळं ती प्रतिक्रिया देवू शकत नाही. परिणामी पुढं धावणं अशक्यच होतं. म्हणून तर वाळूवर धावण्यापेक्षा चालणं जास्त श्रेयस्कर असते. आणि वाळूत चालण्यापेक्षा जमिनीवर चालणं सहज शक्य होतं.

असा विचार करत करत कासव ठरलेल्या ठिकाणापर्यंत पोहोचलेसुद्धा. इकडे सशाला जाग आली. त्यानं मागे वळून बघितलं तर तिथं कासव नव्हतेच. मग पुढे नजर टाकली. तो काय, कासव पोहोचलेले दिसले त्याला. आता धावण्यात काहीच अर्थ नव्हता. शर्यत कासवानं जिंकली होती.

क्रियेस प्रतिक्रिया हा नियम कासवाला कळला होता. ससा बिचारा खजिल झाला.

◆





# ७. शहाणा सिंह

एकदा एक शिकारी जंगलात शिकार करण्यासाठी शिरला. त्याच्याकडे धनुष्यबाण होते. त्याचा नेमही अगदी अचूक होता. आणि त्याचा बाणही दूरवर जात असे. नेम धरून तो आपली शिकार करी आणि पोट भरत असे.

शिकारी रानात खूप आतपर्यंत शिरला. कारण त्याला माहीत होतं की आतल्या भागात भरपूर जनावरे आहेत. झालंही तसंच. जनावरांना शिकाऱ्याची चाहूल लागली. त्यांनी ती चाहूल ओळखली. शिकारी दबा धरून आपली शिकार करणार हे त्याच्या हालचालीवरून त्यांनी ओळखलं. त्याबरोबर ती भ्यायली. त्याची पळापळ सुरू झाली. कोल्हे पळू लागले. लांडगे पळू लागले, चित्ते पळू लागले, वाघही पळू लागले. मग काय ससे तर केव्हाच पसार झाले होते. पळणारी सारी मोठमोठी आणि पराक्रमी जनावरे होती तशी सशासारखी भित्री भागुबाईही होती. प्रत्येकजण आपला जीव वाचवण्याच्या नादात होता.

ही पळापळ सुरू झाली आणि एकच धमाल उडाली. शिकाऱ्याला त्यांची धांदल पाहून गंमत वाटली.

सिंहराज गुहेत पहुडलेले होते. त्याने बाहेर कोलाहल ऐकला. तो गुहेतून बाहेर आला. आपली प्रजा का पळतेय ते पाहू लागला.

शिकाऱ्यानं त्याला पाहिलं. हातातील धनुष्यबाण सरसावला. धनुष्याच्या प्रत्यंचेला बाण लावला आणि प्रत्यंचा ताणला. सिंह अगदी जवळ आला होता.

शिकाऱ्यानं नेम धरला आणि सिंहाला म्हणाला, ''अरे वेड्या, थांब थांब माझ्यावर चालून येतोस

काय? हा पाहा माझा नोकर. याच्याशी आधी लढ. दाखव तुझा पराक्रम. ये बाणासमोर आणि मग माझ्यावर चालून ये.''

असं म्हणून त्यानं प्रत्यंचेला जोरानं खेचला आणि क्षणात ताण सैल केला. बाण सूऽऽऽऽऽऽ सूऽऽऽऽऽऽ करत गेला आणि सरळ सिंहाच्या कुशीतच शिरला.

वेदनेनं सिंह व्याकूळ झाला. त्याच्यातील लढण्याचं त्राणच नाहीसं झालं. जीव वाचवण्यासाठी तो रानात पळून गेला.

तो सिंहाजवळ गेला आणि म्हणाला, ''महाराज, हे काय? तुम्ही तर आमचे राजे. शूर, बलवान, मग हे अतर्क्य कसे घडले? आम्हाला आधार कोण देईल? तुम्ही लढायला हवे. शिकाऱ्याला ठार मारायला हवे. राज्य सांभाळायला हवे.''

कोल्ह्याचं बोलणं ऐकून सिंह म्हणाला, ''बाबारे, तू म्हणतोस ते खरंय. पण मला एक वैज्ञानिक सत्य उमगलंय.''

''ते कोणते?'' कोल्होबानं विचारलं.

''अतिवेगवान वस्तू, मग ती किती का बारीक असेना, ती जर अंगावर येऊन आदळली तर प्राणांतिक वेदना होतात. आता हेच बघ ना, मी तुला उभ्या उभ्या पायानं साधा धक्का मारला तर फार तर तू जागच्या जागी कोलमडशील. पण समज मी वेगानं येऊन तुझ्यावर आदळलो तर तुझा पार चेंदामेंदा होऊन जाईल. तेव्हा वस्तूचा वेग तिच्या वस्तुमानापेक्षा जास्त महत्त्वाचा ठरतो. शिकाऱ्याचा बाण बारीकसा असला तरी तो प्रचंड वेगवान होता. केव्हा आला आणि केव्हा शरीरात घुसला ते देखील कळलं नाही. आपण सगळे सुद्धा शिकार करताना वेगानं पळतो ते काम फक्त शिकार पकडण्यासाठी नाही, तर त्या वेगामुळं शिकारीवर बसणारा फटका तिचा क्षणात खात्मा करतो म्हणून. इथे तर माझ्या वेगापेक्षा शिकाऱ्याच्या बाणाचा वेग प्रचंड आहे. तेव्हा लढण्यापेक्षा जीव वाचवणेच अधिक श्रेयस्कर. उगाच लढून मरेन तर फुकट जाईन. पण जिवंत राहिलो तर दुसरं राज्य मिळवीन. 'शिर सलामत तो पगडी पचास!'



# ८. सूर्य आणि वारा



एकदा वारा ढगांशी अवखळपणे खेळत होता. ढगांना उगाचच इकडून तिकडे दडवत होता. मग त्याने साऱ्या ढगांना एकत्र जमवले आणि झटक्यात चौफेर उधळवून टाकले. त्याने सूर्य झाकोळून गेला. त्याचा प्रकाश चोहीकडे पोहोचेना. त्यामुळे सूर्य त्रासला. अन् त्रासिकपणे वाऱ्याला म्हणाला, ''काय रे वाऱ्या, काय पोरखेळ मांडलायस् ?''

वारा आपल्याच गुर्मीत होता. तो म्हणाला, 'पोरखेळ ? वेडा की खुळा ? मी माझे सामर्थ्य दाखवत आहे.''

''कसले सामर्थ्य ?''

''तुला काय कळणार म्हणा ते.''

तुच्छतेनं सूर्याकडे पाहत वारा म्हणाला, ''ते कळण्यासाठी मुळातच अंगी सामर्थ्य असावं लागतं. ही दुबळ्यांची कामं नव्हेत.''

''कुणाला दुबळा म्हणतोस रे तू ?'' सूर्यानं संतापून विचारलं.

''कुणाला म्हणजे काय ? अर्थात तुलाच.'' वारा त्याला खिजवत म्हणाला.

आता मात्र सूर्याला त्याची कीव करावीशी वाटली. तो म्हणाला, ''अरे वेड्या, मी समुद्र आटवतो. पाण्याची वाफ करतो. वाफेचे ढग होतात. त्यांना फक्त हलवण्याचं तू काम करतोस. त्यात कसले आलेय सामर्थ्य ?''

''अरे पण ढग हलवून तुला झाकोळून टाकल्यावरच ढगांना थंडावा मिळतो. तेव्हाच पाऊस पडतो ना ? मी नसेन तर झाडाचं एक पानदेखील हलणार नाही.''

''मी हिमालय वितळवतो. जगाला उष्णता आणि प्रकाश देतो. त्यामुळेच तर वनस्पती कर्बग्रहणाची क्रिया करून अन्न तयार करू शकतात. हिमालयाचं बर्फ वितळल्यामुळं नद्यांना बारमाही पाणी असतं. त्यावर धरणं बांधून माणूस विद्युत्शक्ती निर्माण करतो. आणि त्या पाण्याने शेतीही करतो. म्हणजे मी जीवांना जगवतोच पण विद्युत्शक्तीमुळं रात्रीचा उजेडही अप्रत्यक्षपणे देतो. साऱ्या जगाचा ऊर्जास्रोत मी आणि तरीही तू म्हणतोस की मी दुबळा ?''

''अर्थातच. तुझे हे सारे फालतू उद्योग आहेत. प्रकाश काय पणतीही देते. पण माझ्या फुंकरीनं

फटकन विझते. तसंच बर्फाचं पाणी काय गॅस आणि स्टोव्ह यांनीही करू शकतो. पण त्यांच्यावर मी चालून गेलो की ते पटकन् विझून जातात. एवढंच काय अरे, मी तुलासुद्धा झाकू शकतो. प्रचंड वृक्षांना उन्मळून पाडू शकतो. ढगांना धावडवून एकमेकांवर आपटायला लावतो. एवढं प्रचंड सामर्थ्य आहे माझं ! तेव्हा मीच मोठा ! मीच पराक्रमी !''

दोघेही अशाप्रकारे आपापले मोठेपण सांगू लागले. शब्दाला शब्द वाढला. कडाक्याचे भांडण सुरू झाले. कुणीही मागे हटायला तयार नव्हता.

तेवढ्यात रस्त्याने एक प्रवासी जाताना दिसला. सूर्य तेव्हा वाऱ्याला म्हणाला, ''हे बघ, असं भांडून काही निष्पन्न होणार नाही. आपापलं सामर्थ्य सिद्ध करायला एक संधी चालून आलीय. तो माणूस पाहिलास ? त्याच्या अंगात कोट आहे. तो उडवून दाखवायचा. कबूल ?''

''हॅ. हे तर काम एकदम सोप्पच. बघच आता क्षणात काय घडतंय ते.''

असं म्हणून वारा वाहू लागला. अगदी सोसाट्यानं, वादळच आल्यासारखे वाटले. माणसाला थंडी वाजू लागली. तेव्हा त्यानं कोट अंगाभोवती घट्ट लपेटला. त्याची बटणंसुद्धा लावून घेतली. तरीही सोसाट्याच्या वाऱ्यामुळं तो उडत होता म्हणून माणसाने कोटाभोवती आपले हात लपेटले.

वारा खूप धडपडला. पण माणसाने काही अंगावरचा कोट काढला नाही. अखेर वाहून वाहून वारा थांबला. त्याची सारी शक्ती संपली. एका झाडावर जाऊन तो निपचित पडला.

तेव्हा सूर्य म्हणाला, ''आता माझा पराक्रम पाहा.''

असं म्हणून सूर्य माणसापुढं आला. त्याने माणसाला ऊब दिली. तेव्हा माणसाला बरे वाटले. वादळापासून सुटका झाल्याचा आनंद त्याच्या चेहऱ्यावर दिसू लागला. मग सूर्य त्याला आणखीन सामोरा गेला. त्याच्या उबेचे उष्णतेत रूपांतर झाले. माणसाला आता उकडू लागले. तेव्हा त्याने कोटाची बटणे काढली. जरा वेळाने उकाडा आणखीनच वाढला. कारण सूर्य त्याच्या अगदी समोरच आला होता. तेव्हा त्या माणसाने सरळ अंगातला कोट काढला आणि हातावर ठेवला. सूर्यानं आत्मविश्वासानं वाऱ्याकडे पाहिले. वारा बिचारा खजिल झाला होता. तेव्हा सूर्य म्हणाला, ''वृथा अभिमान करी अपमान, हे लक्षात ठेव. ही तर साधी झलक होती. तुझं अस्तित्व फक्त पृथ्वीपुरतंच आहे. पण ह्या साऱ्या ग्रहमालेचं अस्तित्वच माझ्यामुळं आहे. पर्यायाने तुझंसुद्धा हे विसरू नकोस. बेडकी फुगली कितीही तरी बैल होऊ शकत नाही.''

◆





# ९. म्हातारी आणि वैद्य

एका गावात श्रीमंत म्हातारी राहत होती. म्हातारपणामुळं तिला आंधळेपण आलेलं होतं. त्यामुळं ती दुबळी झाली होती. तिला सतत दुसऱ्यांवर अवलंबून राहावं लागे. आपल्या आंधळेपणावर उपाय करावा म्हणून तिनं एका वैद्याला बोलावलं.

वैद्य आल्यावर त्याला ती म्हातारी म्हणाली, ''बाबारे, तुझी कीर्ती दिगंत पसरलीय. तेव्हा तू माझे डोळे नक्कीच बरे करू शकशील. तू जर माझे डोळे बरे केलेस आणि मला पुन्हा दिसायला लागलं तर मी तुला एक हिरा देईन.''

वैद्यानं लगेच उपाय करायचे कबूल केले. तो रोज तिच्या घरी जाऊ लागला. तिच्या डोळ्यात औषध घालू लागला. त्याला खरं तर औषधाची खात्री नव्हती. पण हिऱ्याची आशाही सुटत नव्हती म्हणून तो प्रयत्न करत होता.

शिवाय त्याच्या डोक्यात दुसराच बेत शिजत होता. म्हातारीचं घर अनेक किंमती वस्तूंनी भरलेलं होतं. त्यांच्यावर वैद्याचा डोळा होता.

तो रोज म्हातारीच्या घरी जाई. औषधपाणी करी आणि निघताना घरातील एक किंमती वस्तू उचली.

असेच दिवस चालले होते. म्हातारीची इच्छाशक्ती प्रबळ होती. वैद्याच्या औषधाचा गुण येऊ लागला. म्हातारीला अंधुक दिसू लागले. दिसू लागताच ती घरभर फिरली. घर रिकामे रिकामे दिसले. पण तिने चाणाक्षपणे मौन पाळले. डोळ्यांनी दिसू लागले हे गुप्त ठेवले. वैद्याचे औषध सुरूच ठेवले.

डोळ्यांसमोरून एकेक वस्तू नेताना ती वैद्याला पाहत होती. थोड्याच दिवसांनी डोळे पुरते सुधारले. तिला उत्तम दिसू लागले.

एके दिवशी ती वैद्याला म्हणाली, ''बाबारे, तुझं औषध निकामी आहे. एवढे दिवस डोळ्यात

घालूनही काहीच उपयोग झाला नाही. तेव्हा उद्यापासून तू येऊ नकोस.''

म्हातारी असे म्हणत होती आणि वैद्याच्या डोळ्यात रोखून डोळसपणे पाहत होती. तिला नीट दिसतेय हे वैद्यानं ओळखलं. तेव्हा तो तिच्याशी भांडू लागला. आपल्या बिदागीचा हिरा मागू लागला.

म्हातारी काही हिरा देईना. तेव्हा वैद्य न्यायालयात गेला. न्यायाधीशांनी दावा ऐकला. म्हातारीला खुलासा विचारला. तेव्हा म्हातारी म्हणाली, ''महाराज डोळ्यांनी माणूस बघतो म्हणजे नेमके काय घडते? तर समोरच्या पदार्थांची प्रतिमा डोळ्यांतल्या दृष्टिपटलांवर पडते. तिची संवेदना दृष्टीचेतंतूत मेंदूकडे पोहोचवतात आणि मेंदू त्याचा अर्थ लावून त्या पदार्थाचा मग आपल्याला बोध होतो. असंच ना? मी आंधळी होण्यापूर्वी माझे घर किंमती वस्तूंनी भरलेले होते. तेव्हा कोणती वस्तू कोठे आहे हे मी आंधळी झाल्यावरही मनश्चक्षुंद्वारे पाहतच होते. वैद्याच्या औषधाने माझे आंधळेपण गेले आहे. पण घर मोकळे दिसत आहे. एकही वस्तू दिसत नाही. मला जर खरंच दृष्टी आली असेल तर त्या वस्तू पूर्वीच्याच ठिकाणी दिसायला हव्यात ना? पण त्या वस्तू जागेवर दिसत नाहीत. तेव्हा मला गुण आला नाही हेच सिद्ध होत नाही काय? मग मी याचे देणे कसे काय लागते?''

म्हातारीच्या चाणाक्षपणावर न्यायाधीश खुश झाले. त्यांनी नीट चौकशी केली. वैद्याची सारी संपत्ती जप्त केली. म्हातारीच्या साऱ्या चीजवस्तू परत केल्या. वैद्याला त्याच्या या करणीबद्दल जाहीर फटक्यांची शिक्षा दिली. अन् मग राज्यातून हाकलून लावले.

शेवटी काय ऊस गोड लागला म्हणून मूळापासूनच खायला गेला वैदू आणि मातीच तोंडाशी आली त्याच्या.

◆



# १०. उंटावरचा शहाणा




ते उन्हाळ्याचे दिवस होते. शाळा नुकतीच सुटली होती. ऊन रणरणत होते. शाळेतून एक मुलगा घरी परतत होता. वाटेत त्याला एक तळे लागले. तळ्याकाठी तो खेळत बसला. तळ्याच्या पाण्यात पाय टाकल्यावर त्याला बरे वाटले.

मुळातच उकडत होते. पाण्याच्या गार स्पर्शाने तो सुखावला होता. त्याला पाण्यात उतरण्याचा मोह अनावर झाला. पण त्याला पोहता येत नव्हते. त्याने विचार केला की, आपण तळ्याच्या काठावरच डुंबू म्हणजे मग पोहण्याचा प्रश्नच येणार नाही. नितळ पारदर्शक पाण्याने त्याला मोहवले.

विचार पक्का झाला. दप्तर शेजारीच झाडीत ठेवले. कपडे काढले. अन् अंघोळीसाठी तो पाण्यात उतरला. तळ्याचा तळ त्याला जवळच दिसत होता. त्याला वाटले पाणी कमीच आहे. म्हणून तो आणखी पाण्यात शिरला.

पण त्याचा अंदाज चुकला होता. जे पाणी त्याला उथळ वाटले होते ते प्रत्यक्षात खूप खोल होते. त्याच्या पायाखालचा आधार सुटला. मुलाला भीती वाटू लागली. तो किनाऱ्याकडे येण्यासाठी धडपडू लागला. पण पोहता येत नसल्यामुळं पाण्यातच गटांगळ्या खाऊ लागला.

तिकडून एक विद्वान येत होता. त्याला मुलगा पाण्यात गटांगळ्या खाताना दिसला. तो मुलाला म्हणाला, ''काय झालं रे, गटांगळ्या काय खातोस?''

मदतीच्या आशेने मुलगा म्हणाला, ''मला वाटले पाणी उथळ आहे. तळ वरच दिसत होता पण प्रत्यक्षात तळ खूप खोल आहे. मला पोहता येत नाही. वाचवा मला.''

असं म्हणत असतानाच त्यानं आणखी एक गटांगळी खाल्ली.

त्यावर तो विद्वान म्हणाला, ''बरोबर आहे. प्रकाशाच्या अपवर्तनाचा हा परिणाम आहे. बादलीत टाकलेलं पैशाचं नाणं नाही का वर उचलल्यासारखं दिसत. तसंच आहे हे. प्रकाशकिरण विरळ माध्यमातून घन माध्यमात जाताना स्तंभिकेजवळ जातात. त्यामुळं तळ उचलल्यासारखा दिसतो.

त्याला आभासी जाडी म्हणतात. बघ, हवा हे विरळ माध्यम आणि पाणी हे घन माध्यम तेव्हा...''

''अहो ही काही मला शास्त्राचा नियम समजावून सांगायची वेळी नाही. आधी माझे प्राण वाचवा.'' तो मुलगा जीवाच्या आकांताने ओरडत त्याला हात वर करून बोलावू लागला. आता त्याच्या नाकातोंडात पाणी जाऊ लागले होते. तो गुदमरू लागला होता.

''अरे वेड्या तेच तर मी सांगतोय, पाण्याला काय भितोस? माणूस पाण्यापेक्षा हलका असतो. पाण्याची घनता एक असते आणि माणसाची त्याहून कमी म्हणून तर माणूस पाण्यावर तरंगतो. असा शास्त्राचा सिद्धांत आहे. तेव्हा तू असं कर आता. श्वास बंद कर. मग तोंड मिटून घे. नंतर पाण्यात आंडवा हो...मग''

विद्वान व्याख्यान झोडत होता. उंटावरून शेळ्या हाकत होता. पुस्तकातील पढवलेलं बोलत होता. तिकडे मुलगा गटांगळ्या खावून गुदमरायला लागलेला होता. विद्वानाचे काही एक ऐकण्याच्या मनस्थितीत नव्हता. तो प्राणांताने आक्रोशत होता.

तेवढ्यात उलट बाजूने एक शेतकरी आला. त्याला परिस्थितीचे क्षणार्धात आकलन झाले. तो तडक पाण्यात उतरला. मुलाला अलगत उचलले आणि काठावर आणून उलट निजवले अन् पाठीवर दाब देऊन नाकातोंडात गेलेलं पाणी काढू लागला.

थोड्या वेळाने मुलाला बरे वाटू लागले. तेव्हा विद्वानाकडे पाहत शेतकरी म्हणाला, ''व्यवहाराशिवाय विद्वत्ता फुकट असते, कुचकामी असते हे तुम्ही सिद्ध केलंत. जो माणसाला वाचवू शकत नाही तो पुस्तकी जगातला पढत पंडित असला तरी व्यवहारात मूर्खच असतो.''

◆





# ११. एकीचं बळ

एका म्हाताऱ्या शेतकऱ्याला चार मुलगे होते. दुर्दैवानं चारही उनाड निघाले. काही काम न करता नुसते इकडे तिकडे उंडारायचे, भांडायचे आणि बापाच्या जीवावर चैन करायचे.

शेतकरी आता फार थकल्यामुळे त्याच्याच्याने शेतीची कामं नीट होत नसत. पण मुलांचा शेतकामाला हातभार लागत नसल्याने. त्याला सतत मुलांची चिंता असे. आपल्यामागे या मुलांचे कसे होईल या विचारानं तो खंगत चालला आणि अतिश्रम व काळजीने आजारी पडला. त्याला जाणवलं आपली मरण घटका जवळ आलीय. तेव्हा शेवटचा उपाय म्हणून एके दिवशी मुलांना जवळ बोलावले.

बाप आता काय उपदेश करतो हे ऐकण्यासाठी मुलं नाखुषीनेच गेली. त्याच्याजवळ सतत उपदेशाचे डोस ऐकून त्यांना बापाच्या बोलण्याचा कंटाळा येई. पण आता बाप आजारीच असल्यामुळं ते नाईलाजानं का होईना त्याच्याजवळ गेले. शेतकऱ्यानं त्यांना जवळ बसवून घेतलं.

मग तो त्यांना म्हणाला, ''बाळांनो, मी आता चाललो. माझी मरण घटका जवळ आलेली दिसतेय मला. तुम्ही सारखे आपापसात भांडत बसता, उनाडक्या करत राहता. आपल्या वाईटावर अनेक नातेवाईक टपले आहेत.''

''हे सगळं तुम्ही पुन: पुन्हा किती वेळा ऐकवणार बाबा आम्हाला. आमच्यात एवढी ताकद आहे की, आम्ही एकेकटे समर्थ आहोत नातेवाईकांशी सामना करायला. कोणाची बिशाद आहे आमच्या वाटेला जायची ?'' सर्वात मोठा मुलगा म्हणाला आणि जायला उठला.

त्याला बसवत शेतकरी म्हणाला, ''मला माहीत आहे तुम्ही तरुण आहात. ताकदवान आहात. तेव्हाच लहानशी गोष्ट करा माझ्यासाठी जर तुम्ही यशस्वी झालात तर मी काही बोलणार नाही. कबूल ?''

''ठीक आहे.''

त्यावर शेतकऱ्यानं सांगितलं, ''हे पाहा बाळांनो, आज मी तुम्हाला माझे सगळे अधिकार देणार आहे. त्यासाठी तुमच्यातून एकाला पुढारी करणार आहे. जो सगळ्यात ताकदवान ठरेल तो पुढारी होईल. ही चार काठ्यांची मोळी पाहिलीत. ही मोळी न सोडता काठ्या मोडून दाखवायच्या. तुमच्यापैकी

जो हा पराक्रम करेल तो पुढारी होईल.''

''ह्यात काय मोठसं. आता मोडतो बघा.'' असं म्हणत सर्वात मोठा मुलगा उठला. त्यानं गर्वानं छाती फुगवली. मोळी उचलली आणि मांडीवर टेकवून दोन्ही हातांनी जोरानं दाब दिला. पण फुकट! अंगात असेल नसेल तेवढी शक्ती एकवटून प्रयत्न केला. पण मोळी काही तुटेना. शेवटी थकून मान खाली घालून मोळी जमिनीवर ठेवली आणि बाजूला सरकला.

आता दोन नंबरच्या मुलाची पाळी आली. त्यालाही आपल्या शक्तीचा गर्व होता. त्याने मोळी हातात घेतली. दोन्ही हातांवर तोलली आणि झटकन मांडीवर आपटून दोन्ही टोकांनी दाब दिला. पण मोळी जरासुद्धा वाकली नाही. अर्थातच त्यालाही मोळी तोडता आली नाही.

नंतर तिसऱ्या मुलानं मोळीशी झटापट केली. त्याचीही पहिल्या दोन भावांसारखी स्थिती झाली. चौथ्याचीही तीच गत झाली. चौघांचेही प्रयत्न फुकट गेले.

शेतकरी मनातल्या मनात हसत होता. त्यानं ती मोळी हातात घेतली. त्यातील एकेक काठी वेगवेगळी केली आणि प्रत्येकाच्या हातात दिली. मग म्हणाला, ''आता ही एकेक काठी मोडून दाखवा.''

प्रत्येकानं काठी आपापल्या मांडीवर ठेवली आणि थोडासाच जोर लावून फटाफट काठ्या मोडल्या, अगदी सहजपणे.

त्यावर शेतकरी म्हणाला, ''पहा बाळांनो, चार काठ्यांची एकच मोळी केली तर ती तुम्हा कुणालाही तोडता आली नाही. पण मोळीतील काठ्या सुट्या केल्याबरोबर एकेक वेगळी काठी तुम्ही सहज मोडू शकलात. ह्यामागे साधं वैज्ञानिक तत्त्व आहे. 'दाब हा क्षेत्रफळाच्या व्यस्त प्रमाणात असतो.' हेच ते तत्त्व. एका काठीचं क्षेत्रफळ कमी असतं. म्हणून दाब लावल्यावर त्याचा परिणाम लगेच दिसतो आणि काठी मोडते. पण चार काठ्या एकत्रित करून मोळी तयार केली की, मोळीचं क्षेत्रफळ वाढतं. त्यामुळं दाब लावूनही मोळी तुटत नाही. म्हणजे हे कसं आहे पाहा, सफरचंद खाताना तुम्ही पुढच्या दातांनी त्याचा तुकडा तोडता. दाढांनी तसा तुकडा तोडता येईल का? नाही ना? कारण दाढांचं क्षेत्रफळ पुढच्या दातांपेक्षा जास्त असतं. म्हणून पुढच्या दातांनी दाब देऊन तुकडा तोडायचा आणि दाढांनी त्याचा भुगा करायचं असं हे बत्तीस दातांचं काम असतं. तोच प्रकार मोळीच्या बाबतीत होतो. तेव्हा एकीचं बळ किती असतं हे वेगळं सांगायला हवं का मी? म्हणून सांगतो बाळांनो, व्यवहारात विज्ञान पाहायला शिका म्हणजे तुमचा भविष्यकाळ उज्ज्वल होईल.''

चारही मुलांना शेतकऱ्याचं म्हणणं एकदम पटलं आणि त्या दिवसापासून ते एकोप्याने श्रमू लागले!

◆



# १२. सरडा



दोन प्रवासी जंगलातून प्रवास करत होते. हरीत जंगल असल्यामुळं पक्षीकुंजन, प्राण्यांच्या डरकाळ्या आणि रातकिड्यांची भरदिवसा किर्रऽऽ किर्रऽऽ असा नैसर्गिक वाद्यवृंद चालू होता. दोघांनाही एकमेकांची साथ असल्यामुळं भीती थोडी कमी झाली होती. तशी ती पाऊलवाट पायाखालचीच होती. पण जंगलातून जात असल्यामुळं एकट्यानं प्रवास करणं धोक्याचं होतं.

वाटेत त्यांच्या गप्पा चालू होत्या. गप्पांच्या ओघात सरड्यांच्या संबंधी गप्पा निघाल्या. सरड्यांच्या शेपट्या कशा लांब असतात आणि ते डोळे कसे गरगर फिरवतात, असं बोलणं चालत असतानाच ते सरड्याच्या रंगासंबंधी बोलू लागले.

त्यातील एक प्रवासी म्हणाला, ''सरड्याचा रंग निळा असतो. परवाच मी पाहिला निळ्या रंगाचा सरडा.''

त्यावर दुसरा प्रवासी म्हणाला, ''चल हट्, सरड्याचा रंग हा नेहमी हिरवाच असतो म्हणून तर तो झाडाझुडूपात राहतो. आपल्याला कोणी ओळखू नये म्हणून.''

''अरे पण मी स्वत: पाहिलाय तो निळा असतो ते.''

''मी पण पाहिलाय तो हिरवाच असतो. माझ्या डोळ्याच्या काही खाचा झालेल्या नाहीत. उगाच काहीतरी बंडलबाजी करू नकोस.''

बोल बोल म्हणता दोघांचा वाद इतका विकोपाला गेला की, त्याचं भांडणात रूपांतर झालं. दोघांपैकी कुणीही आपलं म्हणणं सोडायला तयार होईना.

इतक्यात सुदैवानं समोरून त्यांना एक प्रवासी येताना दिसला. दोघांनीही वाद थांबवून त्याला

विचारायचं ठरवलं.

तिसरा गृहस्थ जवळ आल्यावर त्याला ह्या दोघांनी वादाचे कारण सांगितले. आणि वाद मिटविण्याचे आवाहन केले.

ते ऐकून हा तिसरा माणूस संतुष्ट होऊन हसत हसत त्यांना म्हणाला, ''बाबांनो, तुम्ही दोघेही चुकलात. काल रात्रीच मी एक सरडा स्वत:च्या हाताने पकडून कागदाच्या डब्यात ठेवलाय त्याचा रंग असतो ना हिरवा ना निळा. तो असतो काळ्या रंगाचा.''

हे ऐकून दोघेही आश्चर्यचकित झाले. ''काय म्हणता काळा आहे!'' अगदीच अशक्य. दोघेही एकदमच म्हणाले.

''मी पाहिलाय तो निळ्या रंगाचा सरडा.''

''आणि मी पाहिलाय हिरव्या रंगाचा सरडा.''

''हे बघा, हातच्या कांकणाला आरसा कशाला. रात्री पकडलेला सरडा माझ्या पांढऱ्या डब्यात ठेवलाय. आणि तो डबाही माझ्याबरोबर आहे. तेव्हा डबा उघडून पाहूया. रंग पाहून तुम्हीही खात्री करून घ्या म्हणजे झाले.''

इतके बोलून त्या माणसाने डबा उघडला. आणि पाहतात तो काय तिघांचीही बोटे आश्चर्याने तोंडात गेली. सरड्याचा रंग पाहून तिघेही बावचळले. कारण त्या डब्यातल्या सरड्याचा रंग होता चक्क पांढरा - दुधासारखा.

तिघांनाही घोटाळ्यात पडलेले पाहून तो शहाणा सरडा म्हणाला, ''निसर्गाने प्रत्येकाला वैशिष्टयपूर्ण गुणधर्म दिलाय हे तुम्ही कसे विसरता? तुम्हा मानवांना स्वसंरक्षणासाठी बुद्धी मिळालीय तर आम्हा सरड्यांना स्वसंरक्षणासाठी रंग बदलण्याचं सामर्थ्य. ज्या ठिकाणी जाऊ त्या पार्श्वभूमीचा रंग आम्हाला बदलता येतो. म्हणूनच प्रत्येक वेळेस तुम्हाला आम्ही वेगवेगळ्या रंगाचे दिसतो. आमच्या शरीरातील विशिष्ट ग्रंथींकडून हे कार्य होते.''

''निसर्गाची लीला अगाध आहे.''

सरड्याचं एखाद्या तत्त्ववेत्याप्रमाणे बोलणं ऐकून तिसरा प्रवासी अभावितपणे म्हणाला.

सरडा पुन्हा बोलू लागला. ''तेव्हा मनुष्यप्राण्यांनो, कोणत्याही गोष्टीसंबंधीचे पूर्ण ज्ञान असल्याशिवाय ठाम अभिप्राय देण्याचे धाडस करू नका. चालू वादात तुमच्या तिघांचेही म्हणणे खरेच आहे. कारण तुम्ही तिघांनीही मला वेगवेगळ्या परिस्थितीत पाहिलेय. मी निळा, हिरवा, काळा आणि पांढराही असू शकतो. मी एकच असतो पण दरवेळी परिस्थितीनुरूप स्वसंरक्षणार्थ रंग बदलतो. या वादावरून तुमच्या लक्षात आलंच असेल की, आपल्या अनुभवाएवढाच दुसऱ्याचाही अनुभव खरा असू शकतो. तेव्हा दुसऱ्याच्याही अनुभवाला आपल्या अनुभवाइतकीच किंमत द्या. त्याचे मोल कमी समजू नका.''

◆





# १३. बुजणारा घोडा

एका घोड्याला आपल्याच छायेला बुजण्याची खोड होती. त्याची ही खोड जावी म्हणून त्याच्या मालकाने खूप प्रयत्न केले. शेवटी त्याला काटेरी लगामही घालून पाहिला. पण व्यर्थ. त्याची बुजण्याची खोड काही जाईना.

एकदा वैतागून मालक घोड्याला म्हणाला ''अरे मूर्खा, छाया म्हणजे तुझीच सावली. तुझ्या शरीरातून प्रकाशकिरण आरपार जात नाहीत म्हणून तर पडते ही सावली. बघ, माझीही सावली पडलीय की नाही जमिनीवर. या सावलीला पंजे नाहीत की दात नाहीत. तुझ्या चालण्याच्या आडही येत नाही ती बिचारी. तरी घाबरतोस तिला! मूर्ख आहेस.''

घोड्यानं मालकाच्या म्हणण्यावर शांतपणं उत्तर दिलं, ''धनी, प्रत्येकजण हा कशाला न् कशाला तरी भीत असतोच. मग तो कितीका बलाढ्य असेना. आता तुमचंच उदाहरण घ्याना. तुम्ही माणसे स्वप्नात भिता किंवा अंधारात एखाद्या लोखंडी ओंडक्याला धक्का लागला तर 'भूतभूत' म्हणून ओरडत पळत सुटता. एवढंच काय पण अंधारात आपल्याच पायात सुकलेलं पान चुरलं तरी त्या क्षुल्लकशा आवाजानं घाबरून घामाने ओलेचिंब होता. मग माझ्याच भीतीला का म्हणून नावे ठेवता? आणि मला मूर्ख म्हणता?''

''हे बघ, भीती ही प्रत्येकाच्या मनात वास करते हे आम्ही नाकारत नाही. पण ही भीती जेव्हा अनाठायी असते, अतार्किक असते तेव्हा मात्र तो मूर्खपणाच समजायला हवा. सावलीची

भीती ही अशी मूर्खपणाची आहे.

''आता धनी मला असं सांगा, पूर्वीच्या काळी ग्रहण लागलं की तुम्ही सगळे का घाबरायचे? राहू-केतू या जोडगोळीने चंद्र-सूर्याला गिळला म्हणून का आक्रोश करायचे? त्याच्यावर पडलेली राहू-केतूंची छाया नाहीशी व्हावी म्हणूनच ना तुम्ही लोक ''दे दान सुटे गिरान'' करत भीक मागत फिरायचे. ते का म्हणून? सावलीला घाबरल्यामुळेच ना? म्हणजे सावल्यांना तुम्हीही घाबरत होता. मग आता मलाच का म्हणून नावे ठेवता? म्हणजे ''मी हसे लोकाला शेंबूड माझ्या नाकाला'' असे झाले.''

घोड्याचे असे शहाजोगपणाचे बोलणे ऐकून मालकाला राग आला. तो रागावतच म्हणाला, ''दीड शहाण्या, या झाल्या भूतकाळातल्या गोष्टी. त्यावेळेस ग्रहण कसं होतं हे आम्हाला माहीत नव्हतं. नंतर आमच्याच बुद्धिवादी वैज्ञानिक विचारसरणीनं आम्हाला कळलं की, निसर्गाचा हा खेळ सावल्यांचा आहे. तेव्हापासून आम्ही ग्रहणाविषयीच्या खुळचट कल्पनांना हळूहळू सोडून देऊ लागलो आहोत. आम्हाला आता हे कळलंय की चंद्र, सूर्य आणि पृथ्वी एकाच प्रवासात एका सरळ रेषेत आले की चंद्राची सावली पृथ्वीवर पडून सूर्यग्रहण तर पृथ्वीची सावली चंद्रावर पडून चंद्रग्रहण होते. नियमितपणं घडणारा हा निसर्गाचा आविष्कार आहे. तेव्हा एक लक्षात ठेव की, माणूस हा अनुभवाने शहाणा होतो. ज्ञानाने समृद्ध होऊन खुळचट कल्पना आणि अंधश्रद्धांना थारा देत नाही. वैज्ञानिक दृष्टिकोनामुळेच तर आज माणूस साऱ्या भूतलावर राज्य गाजवतोय. नाही तर तुम्ही पशू सुरुवातीपासून आजपर्यंत आहे त्याच अवस्थेत आहात. काही सुधारणा घडल्याच नाहीत तुमच्यात, होणार तरी कशा म्हणा, ज्यांना समजावून सुद्धा आपल्या वृत्तीत बदल करता येत नाही ते शेवटी पशूच राहायचे.''

◆



# १४. सौदागर आणि उंट



एक सौदागर उंटावर माल लादून गावोगाव फिरत असे. आणि माल विकून गुजराण करत असे. फिरतीचा धंदा-व्यापार असल्यामुळं आठवडा आठवडा घराकडं यायला जमत नसे. उंटाचे पाय म्हणजे जणू गाडीची चाकेच होती. सतत फिरत राहिल्यामुळे उंटही थकत असे. जाताना मालाचं ओझं पाठीवर असे तर येताना व्यापाऱ्याचं. त्याला बिचाऱ्याला कधी आरामच मिळत नसे. घरी आल्यावर एखाद दिवस मिळेल तेवढाच.

असाच एकदा व्यापारी उंटावर माल लादून निघायच्या तयारीत होता. उंट इशाऱ्यासाठी थांबला होता.

सौदागर आज मोठ्याच खुशीत होता. नवनवीन तऱ्हेचा माल उंटावर लादलेला होता. मागच्या वेळची फेरी त्याला चांगलाच धंदा देऊन गेली होती म्हणून ह्या वेळेस नेहमीपेक्षा वेगळा आणि जरा जादाच माल उंटाच्या पाठीवर लादला होता. उंटालाही यावेळी ओझं जरा अंमळ जास्तच आहे हे कळलं होतं.

उंटाला निघण्याचा इशारा करण्यापूर्वी सौदागराच्या मनात काय आलं कुणास ठाऊक? त्यानं एकदम उंटाला प्रश्न केला, 'काय रे, यावेळी कुठच्या रस्त्यानं जायचं!''

उंट म्हणाला, ''सांगून काय उपयोग? माझं थोडंच तुम्ही ऐकणार? तुम्हाला वाटेल त्याच रस्त्यानं तुम्ही मला न्याल.''

सौदागर आज खरंच खुषीत होता. तो म्हणाला, ''नाही. तू सांग. आज मी तुझं ऐकेन.''

''मग या समोरच्या रस्त्यानं सरळ जाऊया.'' उंटानं सुचवलं. ''ठिक आहे तिकडून जाऊया. पण काय रे, हा उजवीकडचा रस्ता का नको? ह्या उजवीकडच्या रस्त्यावर तर उत्तम वनश्री आहे. झाडे- झुडपे उदंड आहेत. पाणीही भरपूर आहे. त्या रस्त्यानं तुझी खाण्यापिण्याची चंगळ असतानाही तू का नको म्हणतोस?''

''तुम्ही म्हणता ते खरंय. पण तो रस्ता चढाचा आहे. आणि ओझं मला वाहायचं आहे. खाण्यापिण्याची



चंगळ असली तरी चढाच्या रस्त्यानं माझी शक्ती जास्त खर्च होईल. त्यासाठी मला जास्त ऊर्जा लागेल. घाटातले रस्ते नाही का वाहनांनी कमी शक्ती वापरून जास्त ओझं वाहून न्यावं म्हणून वळणावळणाचे आणि कमी चढावाचे बनवलेले असतात. तसं ह्या उजवीकडच्या आडवाटेच्या रस्त्याचं थोडंच आहे. व्यापाराच्या गावाला पोहोचायला हा रस्ता जरी जवळचा असला तरी ह्या रस्त्यानं सरळच्या सरळ उंच चढ आहेत. परिणामी माझी दमछाक होण्याचीच शक्यता जास्त म्हणून तो रस्ता नको.''

उंटाचं शहाण्यासारखं बोलणं सौदागरांना एकदम पटलं. मग तो म्हणाला, ''बरोबर आहे तुझा विचार पण हा डावीकडचा रस्ता का नको? तो तर उताराचा आहे. त्यावरनं तर तुला झटकन सहज जाता येईल आणि तुझी दमछाक पण होणार नाही.''

''उतार असेल. पण ओझं घेऊन मलाच त्या रस्त्यानं जावं लागणार. पाठीवर लादलेलं ओझं घेऊन उतारावरनं झपझप थोडंच जाता येणार? आणि समजा मी वेग वाढवलाच तर एखाद्या वळणावर अचानक समोर अडथळा आला, अशा वेळेस एकदम मी थांबलो तर माझ्या पाठीवरचं ओझं धपकन् पुढं पडणार नाही का? तुम्ही नाही का चालती बस अचानक थांबली तर पुढच्या सीटवर धपकन् आपटता. तोच जडत्वाचा गुणधर्म इथंही लागू होतो. आणि पुन्हा माझ्या तळव्यावर सगळा जोर येणार तो वेगळाच म्हणजे उतार असूनही मी थकायचा तो थकणारच. बरं जाताना जरी उताराचा रस्ता असला तरी येताना तो चढावाचा होईल. त्याचं काय? याचाच अर्थ जातानाही दमछाक होईल आणि येतानाही. म्हणून नको.

उंटाचं हे बोलणं ऐकून सौदागर एकदम खुश झाला. तो म्हणाला, ''व्वा. आज मला कळलं की, माझा सोबती किती हुशार आहे ते.''

''तुम्ही माझं मत विचारलं ते मी सांगितलं. सरळ समोरचा रस्ता हा सपाटीचा आहे. त्यामुळं माझी शक्ती जाताना आणि येतानाही आवश्यक तेवढीच खर्च होईल. ओझ्याचाही मला काही त्रास होणार नाही. सपाटीमुळं एकसमान वेगानं मला चालता येईल. त्यामुळं मी जास्त कार्यक्षम आणि उत्साही राहू शकेन.

सौदागरानं उंटाच म्हणणं मान्य केलं आणि सरळ समोरच्या सपाटीच्या वाटेनं व्यापाराला निघाला. ◆



# १५. हुशार गाढव



काय राव काय बाता मारताय? गाढव आणि तेही हुशार! काय वेडबिड लागलंय की काय? असं तुम्ही खचितच म्हणाल. पण बालमित्रांनो, जरा थांबा. आपल्या गोष्टीतील गाढवाची अक्कल तर पाहा मग तुम्हीच म्हणाल की या गाढवाला खरोखरच वैज्ञानिक दृष्टिकोन आहे म्हणून, ऐका हंऽ!

एक श्रीमंत शेतकरी होता. त्याची खूप खूप बागायती जमीन होती. मळ्यामध्ये भाज्या, फळे, फुले बहरून आली होती. भरपूर मजूर कामाला होते. सुगीचे दिवस असल्यामुळे त्याला घरी जावून दुपारचं जेवण करायलाही फुरसत नसे. म्हणून त्याची घरधनीण त्याच्यासाठी भाकऱ्या घेऊन शेतात यायची.

एकदा घरधनीणीने अशीच भाकऱ्या थापून, चटण्या-लोणचं घेऊन त्यांची बांधाबांध केली. अन् गाढवाच्या पाठीवर ओझं टाकून शेतमळ्याकडं चालू लागली.

शेत तसं घरापासून दूरच होतं. वाट पाणंदीतून होती. दोन्ही बाजूला बोरी-बाभळीची काटेरी झुडूपं भरपूर होती. तसंच कडवट, तुरट, गुळचट साऱ्याच जातीचीही झुडूपं होती.

गाढव पाणंदीतून चाललं होतं...दुपारची वेळ असल्यानं त्याच्याही पोटात आग पडली होती. तोही भुकेलेला होता. म्हणून चालता चालता आसपासची तोंडाला लागतील तशी पानं ओरबडत खात चालला होता. चालता चालता तोंडाचा चघळपट्टाही चालूच होता. आपलं पोट भरत होता.

त्याच्या पाठीवरल्या सुग्रास अन्नाची त्याला फिकीर नव्हती. तो आपला झुडूपे खाण्यातच मशगुल होता.

घरधनीण गाढवाचं चरणं पाहत होती. तसं मन रिकामंच होतं. रिकामपणाची कामगिरी म्हणून तिच्या डोक्यात खुळे विचार चालू होते. गाढव झुडूपे खातच होता.

ते पाहून घरधनीण गाढवाला म्हणाली, ''खरंच रे तू गाढव आहेस. उगाच रस्त्यातले काटे खाऊन वेळ घालवतोयस. चल बिगी बिगी.

पण गाढव खरेच शहाणे होते. त्यानं आपलं खाणं क्षणभर थांबवलं अन् घरधनीणीला म्हणाले, ''बाई मला सांगा, तुम्हाला पाण्यात बुडवलं तर काय होईल ?''

गाढवाचा प्रश्न ऐकून घरधनीण रागवलीच. एक सणसणीत रट्टा लगावत त्याला म्हणाली, 'गाढवाच्या लेका, मला पाण्यात बुडवून मारायला टपलायस् होय. थांब तुला माझा इंगाच दाखवते.''

तरीही गाढवाने शांतपणे पुन्हा विचारलं, ''पाण्यातील माशांना जमिनीवर आणलं तर काय होईल.''

''काय होईल म्हणजे काय ? मरतील की रे मेल्या गाढवा.'' करवदत बाई म्हणाली.

''हो नं. जसं तुम्ही पाण्यात विरघळलेल्या ऑक्सिजनवर जगू शकत नाही पण मासे मात्र त्याच ऑक्सिजनच्या प्रमाणात जगू शकतात. तसंच आहे हे माझं खाणं. तुमच्याप्रमाणे एवढंच ताट भरून जेवलो तर माझं पोट कधीच भरणार नाही. आणि तुम्हाला माझ्यासारखं काटेरी झुडूपाचं अन्न खाता येणार नाही. माझ्या पोटातील पचनसंस्था काटेरी अन्न पचवू शकते. तसं तुमची पचनसंस्था कार्य करू शकणार नाही. असं हे साधं अन् सोपं विज्ञान आहे. प्रत्येकाला आपापल्या पर्यावरणातच जगता येतं. मी जर दुसऱ्या वातावरणात जगायचा प्रयत्न केला तर मरूनच जाईन आणि तुम्हीही जर पर्यावरणाविरुद्ध वागलात तर तुमचीही गत तशीच होईल. तेव्हा कोणी कोणाविरुद्ध हसू नये किंवा कुणाला उगाचच गाढव, मूर्ख असं म्हणू नये. प्रत्येकाचा आपापला एक गुणधर्म असतो. तो त्याने पाळावा. आपला मार्ग सुधारावा.''

घरधनी त्याचे शहाण्यासारखे बोलणे ऐकतच राहिली आणि आश्चर्यानं जागच्या जागीच थांबली. गाढव आपलं शांतपणे काटेरी झुडूपांचा पाला खात खात, चघळत चघळत मळ्याकडे चालू लागलं.

◆



# १६. मुंगी आणि कबुतर



उन्हाळ्याचे दिवस होते. मुंग्याचं वारुळात धान्याची कोठारे भरण्याचं काम चाललं होतं. सगळ्या मुंग्या जोमानं कामाला लागल्या होत्या. पावसाळा सुरु होण्याआधीच धान्य साठवणं महत्त्वाचं होतं. त्यांचं काम एका रांगेत शिस्तीनुसार चाललं होतं. अशी शिस्तप्रियता इतर प्राण्यात क्वचितच सापडते. अगदी माणसातही नाही.

कामाच्या गडबडीत एक मुंगी धान्याचा कण शोधता शोधता रांगेतून बाहेर पडली. ह्या टेहळणी मोहिमेत ती इतकी गुंग झाली की, ती आपल्या इतर सख्यांपासून... रांगेपासून बरीच दूर येऊन पोहोचली. फिरता फिरता ती नदीकाठी आली. तिला खूप तहान लागली होती. त्यामुळं ती हळूच नदीतील पाण्यात शिरली. काठावरील पाण्यात शिरून जपून पाणी पिऊ लागली.

नदीला प्रवाह जोराचा होता. पाणी वेगानं वाहत होतं. पाणी पिता पिता मुंगीचा अंदाज चुकला. तिचा पाय प्रवाहात अडकला. जमिनीचा आधार सुटला. आणि तिला पाण्याने वेढा घातला.

गरीब बिचारी मुंगी पाण्याच्या प्रवाहातून वाहू लागली. जगण्याची धडपड करू लागली. सहाही पाय हलवू लागली. पण सारी धडपड फुकट जाणारसे वाटू लागले. कसलाच आधार मिळेना.

तिथेच नदीकाठावर एक झाड होतं. त्यावर एक कबुतर बसले होते. त्याचे मुंगीकडे लक्ष गेले. त्याला तिची दया आली. तिला मदत करावी असे त्याला वाटू लागले. पण मदत कशी करावी हे त्याला कळेना. तो विचार करू लागला. वेळ आणीबाणीची होती. ताबडतोब विचार करून उपाय करायला हवा होता.

लखकन् त्याच्या डोक्यात प्रकाश पडला. मुंगी पाण्यापेक्षा हलकी आहे म्हणून तरंगतेय. याचा अर्थ मुंगीची घनता पाण्यापेक्षा कमी आहे. असाच दुसरा एखादा कमी घनतेचा पदार्थ पाण्यात

टाकला की तो पाण्यावर तरंगेल आणि मुंगीला आधारभूत होईल.

असा विचार करत तो कमी घनतेचा पदार्थ शोधू लागला. दगड पाण्यात बुडतो. म्हणजे त्याची घनता पाण्यापेक्षा जास्त आहे. तो टाकून चालणार नाही. लाकूड पाण्यात तरंगते त्याची घनता पाण्यापेक्षा कमी आहे. पण ते आता कुठं सापडणार ? झाडाची फांदी तर काही आपल्याला तोडता येणार नाही. आता काय करावं बरं ?

अरे, हे काय ! माझ्याएवढ्या जवळच असा तरंगणारा कमी घनतेचा पदार्थ असताना मी गावभर काय वेड्यासारखा शोधाशोध करतोय. हे म्हणजे 'काखेत कळसा अन् गावभर वळसा.' असं झालं की. त्यानं ताबडतोब चोचीनं जवळच्याच झाडाचं पान तोडलं अन् नीट नेम धरून मुंगीच्या पुढ्यात टाकलं.



मुंगी ताबडतोब पानावर चढली. बुडत्याला काडीचा आधार म्हणतात तो असा. ते पान मुंगीची होडीच झाली जणू. पान प्रवाहात वाहू लागलं. मुंगीला पानांच्या होडीत बसून फिरायला मजा वाटू लागली. पुढे वळणावरच पान काठाला लागलं. मुंगी लगेच उतरली. कबुतराचे आभार मानायला जाऊ लागली.

तेवढ्यात तिला दिसलं की समोर शिकारी उभा आहे अन् त्याच्या धनुष्यबाणाचा नेम नेमका आपल्याला जीवन देणाऱ्या कबुतरावरच आहे. तिला असा राग आला की क्षणात शिकाऱ्याजवळ गेली. त्याच्या पायाला कडाडून चावा घेतला.

मुंगीच्या लाळेतील द्रवाने आपलं काम चोख बजावलं होतं. शिकारी वेदनेनं विव्हळला. त्याच्या हातातील बाण निसटला आणि सरळ नदीत जाऊन पडला. तेवढ्यात कबुतर सावध झाले अन् उडून गेले.



# १७. पौर्णिमा आणि अमावस्या



चंद्र जन्मला तेव्हा त्याच्या आईनं मोठा आनंदोत्सव साजरा केला.

चंद्राच्या आईने एके दिवशी चांदण्यांचे झबले शिवून दिले. ते झबले घालून चंद्र आकाशभर हिंडला. कौतुकानं सगळ्यांना ते झबले दाखवत फिरला. रात्रभर नुसता नाचत होता.

दुसऱ्या दिवशी त्याला ते झबले घट्ट होऊ लागले. अंगात दाटू लागले. तिनं कपाटातून दुसरे मोठे झबले चंद्राला काढून दिले. त्यावरही चांदण्या लटकत होत्या. पण त्यांचं प्रमाण कालच्या झबल्यापेक्षा कमी होतं.

तिसऱ्या दिवशी चंद्र पुन्हा रडत रडत आईकडं आला. झबले घट्ट होते म्हणून रडू लागला. आईनं पुन्हा त्याला नवीन झबलं मोठ्या अंगाचं काढून दिलं. चंद्र पुन्हा आनंदाने हुंदडायला गेला.

पण चौथ्या दिवशी, पाचव्या दिवशी अन् पुढे पंधरा दिवस असे रोजच घडू लागले. चंद्र दररोज रडत रडत आईकडं यायचा. झबले घट्ट होते म्हणून सांगायचा. आई त्याला दररोज मग नवीन झबले घ्यायची. चंद्र मात्र दररोज नवीन झबलं मिळाल्यामुळे खूश व्हायचा.

असे पंधरा दिवस गेले. आई मनातच स्वत:शी म्हणाली, ''चला ह्याचे झबले शिवण्याचे दररोजचे काम संपले एकदाचे.''

चंद्राला जरी दररोज नवीन झबले मिळायचे तरी त्याच्या लक्षात एक गोष्ट आली होती की झबल्यावरच्या चांदण्या दररोज कमी कमी होत चालल्यात आणि झबल्याचा रंग पांढरा होतोय. पण नवीन झबले मिळाल्यामुळं तो झबल्याचा देखणेपणा कमी झाला तरी कानाडोळा करत होता. पंधराव्या दिवसाचे झबले तर एकदम पांढरे फटकच होते.

सोळाव्या दिवशी पुन्हा चंद्र वैतागत आईकडं आलाच. ''आई हे काय ग, आज आता हे झबलं सैल होऊ लागलंय.''

त्यावर आई म्हणाली, ''तुझ्याकडे आता पंधरा झबली आहेत ना त्यातलं तुला पाहिजे ते नीट निवडून घे दररोज अन् पुन्हा माझ्या मागे सदा न् कदा कटकट लावू नकोस.''

होता होता पुन्हा पंधरा दिवस गेले. नेहमीप्रमाणे चंद्र झबलं बदलायला कपाटाकडे गेला. पाहतो तो काय कपाटाला कुलूप.

''आता काय करायचं? आई तर बाहेर गेलीय. आणि झबल्याशिवाय मी बाहेर पडणार कसा?'' असा विचार करत चंद्र घरातच बसून आईची वाट बघू लागला. त्या दिवशी तो आकाशात फिरायला गेलाच नाही. त्यामुळे सगळीकडं काळाकुट्ट काळोख पडला.

पृथ्वीवरची माणसं म्हणाली : आज अमावस्या दिसतेय.

चंद्र त्या दिवसापासून काळी लंगोटी लावून उघडाच फिरू लागला. शेवटी म्हणतात ना रोज मरे, त्याला कोण रडे? अशी अवस्था झाली तक्रारखोर चंद्राची.

◆





# १८. भविष्यवादी

एक माणूस स्वतःला मोठा जाणकार भविष्यवादी समजत असे. तो लोकांना कोणती वस्तू कोठे हरवलीय हे त्यांच्या कुंडलीवरून सांगत असे. एवढंच काय तर कुणाचा अपघात योग केव्हा आहे हेही सांगत असे.

एकदा तो अशाच कामात गढून गेला होता. तेवढ्यात गर्दीतून धक्काबुक्की करत एक माणूस त्याच्याजवळ आला अन् घाबऱ्या आवाजात बोलू लागला. 'ज्योतिषी महाशय, चला, लवकर चला, धावा धावा. अहो तुमच्या घराला आग लागलीय. इतकी भयानक आग मी क्वचितच पाहिली असेन. एव्हाना तुमचं घर जळूनही गेलं असेल.'

हे शब्द कानी पडताच त्या ज्योतिषबुवांनी आपल्या घराकडे धूम ठोकली. त्यांच्या मागून सगळी माणसंही पळायला लागली. आग बघायला. तेथे गेल्यावर पाहतात ते काय सगळे घर शाबूत असून त्यास आगबिग काहीच लागलेली नाही.

आपली त्या माणसाने फजिती केलीय हे लक्षात आल्यावर ज्योतिषी चवताळून त्या माणसावर धावून गेले. त्याबरोबर त्यांना थांबवत तो माणूस ज्योतिषाला म्हणाला, ''बाबारे लोकांच्या नशिबात असलेल्या बऱ्यावाईट गोष्टी तुला कळतात तर मग तुझ्या स्वतःच्या नशिबात काय आहे हेदेखील कळू नये ?''

अर्थातच या प्रश्नावर ज्योतिषीबुवांकडे काही उत्तरच नव्हते. त्यांनी शरमेनं मान खाली घातली.

ह्या संधीचा फायदा घेऊन तो माणूस आमजनतेकडं वळून म्हणाला, ''मायबापहो, हे ज्योतिषी आपल्या मनाच्या दुबळेपणाचा फायदा घेऊन आपल्याला ठकवतात. काही महिन्यांपूर्वी हेच ज्योतिषी आपल्या पत्नीसह नौकाविहार करत होते. तेव्हा अचानकपणं त्यांची नौका उलटली. सुदैवानं ( ? ) ते बचावले. म्हणून त्यांनी शांतही केली. त्यावेळचं भोजन तुम्ही अजूनही आठवून तोंडाला पाणी आणता. पण मला एक सांगा, आपल्या सगळ्यांचे अपघात योग सांगणाऱ्या ह्या भविष्यवाद्याला स्वत:चा अपघातयोग कळू नये ?

त्यावर वरताण म्हणजे ज्योतिष हे शास्त्र आहे असं सांगून आकाशातल्या ग्रहताऱ्यांची निरीक्षणे दुर्बिणीने करून आपण किती शास्त्रवेत्ते आहोत हे भासवत असतात महाशय. कुंडलीतल्या नवग्रहांपैकी चार तर ग्रहच नाहीत मुळी. बघा ना, रवि म्हणजे सूर्य, चंद्र, राहू आणि केतू हे काय आपल्या ग्रहमालेतील ग्रह आहेत ? सूर्य तर तारा आहे. चंद्र पृथ्वीचा उपग्रह. राहू आणि केतू तर आकाशात अस्तित्वातच नाहीत आणि तरीही म्हणे हे ग्रह ( ? ) माणसांची दशा करतात !

वाऽऽरे ज्यातिष ! अरे, आकाशातल्या ग्रहांचे मार्ग ठरलेले आहेत ते आपल्या मार्गाने खुशाल जातील म्हणून आपण सर्वांनी वरच्या ग्रहांची काळजी न करता आकाशाकडे दृष्टी लावून बसू नये. नाहीतर आपल्या पायाखालचे खाचखळगे आपल्याला दिसणार नाहीत. मग वर बघता बघता आपण याच खाचखळग्यात धडपडून पडू. तेव्हा भोवतालच्या परिस्थितीकडं लक्ष देणं अधिक चांगलं.

हे ज्योतिषी महाशय दुसऱ्यांना उपदेशामृत पाजतात पण स्वत:वर वेळ आली की कसे पळत सुटतात हे आताच आपल्याला दिसलंय असं म्हणत तो माणूस ज्योतिषांकडं वळून म्हणाला, 'तेव्हा ज्योतिषीबुवा एक माणूस काही काळ माणसांना फसवू शकेल. पण सदासर्वकाळ फसवणूक करणं कठीणच.''

सगळ्या माणसांना त्या माणसाचं म्हणणं पटलं आणि अर्थातच दुसऱ्या दिवसापासून तो महान ( ! ) भविष्यवादी लोकांचे भविष्य सांगण्याचे काम बंद करून निमूटपणे आपल्या शेतात राबू लागला.

◆





## १९. दोरीवरचा नाच

एका डोंबाऱ्याचा मुलगा त्याच्या वडीलांकडून दोरीवरून तोल सांभाळत चालण्याच्या खेळाचा सराव करत होता. वडील त्याला तोल सांभाळून दोन खांबांच्यामध्ये बांधलेल्या दोरीवरून कसं चालत जायचं ते शिकवत होते. एवढंच नव्हे तर दोरीवरून चालताना मधोमध थांबून नाचाची कसरत कशी करायची ते दाखवत होते. हा खेळ करताना तोल सांभाळण्यासाठी बांबूची हलकी काडी कशी आडवी धरावी लागते हेही दाखवत होते. ती काडी हातात आणि तर्जनीमध्ये दोरी अडकवून उभ्या उभ्या झोके कसे घ्यायचे हे दाखवले.

त्या मुलाला मात्र वाटत होतं की दोरीवरून चालताना तो दोर एवढा भक्कम असतो की त्यामुळं काठीच्या आधाराची गरज काय? आणि मी तर चपळ आहे. त्याने वडीलांना पुन्हा पुन्हा सांगून पाहिलं की त्याला काठीची गरज नाही. तो काठीशिवायही दोरीवरची कसरत करू शकेल. काठी जड असल्यामुळं उलट तिचा अडथळा मात्र होतो.

शेवटी मुलगा आपलं ऐकत नाही असं पाहून स्वत:शीच म्हणाले, ''घेऊ दे त्याला अनुभव. पडला म्हणजे कळेल आपोआप काठीचं महत्त्व. त्याला ठेच लागल्याशिवाय शहाणं व्हायचं नसेल तर लागू दे एकदा ठेच.''

त्यानं मुलाला काठीशिवाय चालून दाखवण्याची खूण केली. मुलगा खांबावरून सरसर चढला. दोरीवरून तोल सांभाळत चालू लागला. दोन-चार पावलं टाकली असतील नसतील तोच तोल जाऊन झटक्यात खाली पडला आणि जमिनीवर येऊन आदळला. तरी बरं वडील खाली उभे असल्यामुळं त्यांनी त्याला झेलायचा प्रयत्न केल्यामुळं जमिनीवर आदळताना फारसा जोरानं आपटला नाही.

खरचटलेले गुडघे झटकून तो उठला आणि बाबांना म्हणाला, ''असं कसं झालं ?''

तेव्हा वडील म्हणाले, ''हा सगळा काठी न घेतल्याचा परिणाम.''

मुलगा त्यांच्या चेहऱ्याकडे प्रश्नार्थक नजरेनं पाहू लागला. त्याला अजूनही कळेना की काठीचा आणि दोरीवरून चालण्याचा काय संबंध ?

आता वडील त्याला समजावत म्हणाले, ''तू पाण्यानं भरलेली बादली घेऊन येणाऱ्या तुझ्या आईला बरेचदा पाहिलंस की नाही. ती कशी चालत असते तेव्हा ?''

दुसरा हात लांब पसरला जातो ते शरीराचा तोल सांभाळण्यासाठी. कारण पाण्याच्या वजनानं एका बाजूला भार वाढलेला असतो. त्यामुळं आपला गुरुत्वमध्य आपल्या दोन्ही पायाच्या बाहेर जाऊन आपण पडण्याचा संभव असतो. म्हणून तो पायातच राहण्यासाठी दुसरा रिकामा हात लांब करावा लागतो.''

''ही गुरुत्वमध्य काय भानगड आहे ?''

''कोणत्याही वस्तूच्या मध्यातून जाणारा एक काल्पनिक लंबक. तो जोपर्यंत त्या वस्तूच्या पायांमध्ये असतो तोपर्यंत ती वस्तू स्थिर उभी राहू शकते अन्यथा पडते - तुझ्यासारखी.''

''पण त्या काठीचा यासाठी कसा काय उपयोग होतो दोरीवरून चालताना ?''

''दोरीवरून चालताना काठी आडवी पकडल्यामुळं आपल्या शरीराचा गुरुत्वमध्य दोन पायांमध्ये राहण्यास मदत होते. कारण काठीच्या रुंदीमुळं गुरुत्वमध्य पायाबाहेर जाण्यासाठी जास्त कलंडावं लागतं. म्हणून काठीच ह्या खेळाचा खरा आधार आहे. हा सराव झाल्यानंतर काठी न घेता दोन्ही हात दोन्ही बाजूला पसरूनही दोरीवरून तोल सांभाळत जाता येतं. अशावेळी हे पसरलेले दोन हात आपला गुरुत्वमध्य पायातच ठेवण्यास मदत करतात. आणखी एक गोष्ट आहे पायाचा भाग जेवढा जड असेल तेवढा गुरुत्वमध्य पायातच राहतो. म्हणून तर मांजर कुठूनही पडलं तरी ते शेवटी पायावरच पडतं. आणि त्याच कारणासाठी माणसाच्या पायाच्या हाडाचं वजन शरीरातील इतर हाडांपेक्षा जास्त असते. इतर हाडं पोकळ असतात तर पायाची हाडं त्यामानानं भरीव असतात.''

''अच्छा, अच्छा तरीच मागच्या वेळी आपण मुंबईला गेलो होतो तेव्हा पाहिलं होतं की तेथील डबलडेकर बसमध्ये उभे प्रवासी तळमजल्यावरच घेतात पण वरच्या मजल्यावर प्रवाशांना उभे राहण्याची परवानगी नसते. कारण बसचा तळभाग जड असेल तर ती वळणावर तिरपी झाली तरी कलंडणार नाही.''

''म्हणूनच म्हणतो बेटा, अनुभवी माणसांचं म्हणणं ऐकावं. उगाच हट्टीपणा करू नये.''





# २०. प्रवासी आणि कावळा



दोन माणसे प्रवासाला निघाली होती. तेव्हा त्यांना एक डोळा फुटलेला कावळा आडवा गेला.

ते पाहून त्यातला एक माणूस दुसऱ्याला म्हणाला, ''अरे, हा शकुन काही बरा दिसत नाहीय. आपण आज प्रवासाला जाणं बरं ठरणार नाही. गेलोच तर प्रवासात निश्चितच काही तरी विघ्न येईल. तेव्हा आज बाहेर न पडणं हेच उत्तम.''

त्यावर दुसरा प्रवासी म्हणाला, ''अरे, ह्या सगळ्या शकुन-अपशकुनाच्या खुळ्या कल्पना आहेत. कधीतरी कावळा बसायला आणि फांदी तुटायला एक गाठ पडते. ती फांदी काय कावळ्याच्या वजनानं तुटलेली असते का? तसंच आहे हे. मांजर आडवं जाणं, पापणी फडफडणं, घुबड ओरडणं, पाल चुकचुकणं इत्यादी घटनांना अपशकुन समजणं मूर्खपणाचं आहे. त्यांचा माणसाच्या आयुष्याशी काहीही संबंध नाही. पाल चुकचुकून हे आपलं क्षेत्र आहे हे इतरांना सांगत असते. तर अश्रूपिंडातून एक विशिष्ट प्रकारचा द्रव की जो डोळे स्वच्छ ठेवण्यासाठी पाझरत असतो ती क्रिया नीट न झाल्यामुळं पापणी फडफडते. अशी शास्त्रीय कारण यामागे असतात. तेव्हा शकुनापशकुनांचा बाऊ करू नकोस. चल.''

पण तो माणूस काही प्रवासाला निघायला तयार होईना. तो म्हणाला, ''वाडवडिलांनी जे लावून दिलंय ते खोटं कसं असेल?''

''अरे बाबा, आता ह्याच कावळ्याचे बघ ना. पुढे काय घडणार आहे हे कावळ्याला कळलं असतं तर जिथं त्याचा डोळा फुटला तिथं तो कधी गेला असता का? तेव्हा ही एक नैसर्गिक घटना आहे असं समजुन क्षुल्लक गोष्टींना भलतंच महत्त्व देवू नये. याबाबतीत तुला एक पूर्वीच्याकाळी घडलेली एक गोष्ट सांगतो. ऐक -

फार पूर्वीच्याकाळी एक राजा होऊन गेला. त्याला भविष्याचं फार वेड होतं. त्याच्या राज्यात कोणीही ज्योतिषी आला की, राजा त्याला पाचारण करून भविष्य विचारत असे आणि ज्योतिषाची पोतडी सुवर्णमुद्रांनी भरत असे.

असंच एकदा एक ज्योतिषी नव्यानेच त्या राज्यात आला. लोकांची भविष्ये वर्तवू लागला. शकुनापशकुनांचे दिवस सांगू लागला. कोणाचा मृत्यू केव्हा होईल हे सांगू लागला. हाहा म्हणता त्याची कीर्ती राज्यभर पसरली. राजापर्यंत ही बातमी जाऊन पोहोचली.

राजाने त्याला सन्मानाने बोलावलं. आणि आपलं भविष्य सांगायला सांगितलं. ज्योतिषानं राजाची कुंडली मांडली. काही आकडेमोड केली आणि दु:खित चेहरा करून म्हणाला, ''महाराज अभय

असावं. तरच आपलं भविष्य सांगतो.''

महाराजांनी त्याला अभय दिलं. आणि जलदीनं भविष्य सांग म्हणाले. अगदी अप्रिय असलं तरी चालेल.

ज्योतिषीबुवांनी सांगितलं की, आजपासून बरोबर सहा महिन्यांनी महाराज निवर्तणार आहेत तेव्हा त्यांनी मोक्ष मिळवण्यासाठी आतापासूनच दानधर्म, पूजा-अर्चा सुरू करावी.

राजाला आपल्या मरणाचं भविष्य ऐकून दुःख झालं. त्यानं ज्योतिष्याला तरीही सुवर्णमुद्रा दिल्या अन् त्याचा पाहुणचार केला. अन् त्या दिवसापासून राजाची दिनचर्याच बदलली.

तो दानधर्म आणि पूजापठणात वेळ घालवू लागला. राज्यकारभाराकडे पूर्णपणे दुर्लक्ष झाले. काही सरदारांचे त्यामुळे फावले. ते मनमानी करू लागले. प्रजेला पिडू लागले. वजिराला राजाची ही अवस्था बघवेना. राज्यातही अंदाधुंदी माजण्याची परिस्थिती चार महिन्यातच येऊन ठेपली.

वजिरानं राजाला सांगितलं, 'आपलं राज्यकारभाराकडं दुर्लक्ष होतंय. सरदारांपैकी काही प्रजेला पिडून धनसंपत्ती मिळवू पाहताहेत. काही करा.'

त्यावर राजा म्हणाला, ''आता काय आमचे दोनच महिने राहिले. मी कशासाठी राज्याचा मोह बाळगू. हे सारे तर इथेच राहणार आहे. मला आता मोक्षपदाचाच विचार करायला हवा. माझ्यासाठी आता हे सारं राज्य मिथ्याच आहे.''

वजिराला कळून चुकलं की, राजेसाहेब त्या ज्योतिषाच्या पुरते आहारी गेलेत. आता काय करावं ?

वजीर हुशार होता. त्यानं दरबार भरवला. राजालाही हजर राहण्याची विनंती केली. नंतर त्या ज्योतिषालाही दरबारात बोलावलं. ज्योतिषी सुवर्णमुद्रांच्या लालचीनं लगबगत आला.

ज्योतिषी दरबारात पोहोचल्यावर वजिरानं विचारलं, ''तू सर्वांचं भविष्य पाहू शकतोस. त्यांचे मृत्यू सांगू शकतोस. तर तुझा मृत्यू केव्हा आहे हे सांगू शकशील का ?''

त्यावर ज्योतिषी म्हणाला, ''त्यात काय कठीण.'' तो तर मी केव्हाच कुंडली मांडून काढून ठेवलाय दिवस. मी अजून २० वर्ष २ महिने १२ दिवस जगणार आहे.''

त्याचं हे वाक्य पूर्ण झाल्याबरोबर वजिराच्या म्यानातून तलवार बाहेर पडली. अन् ते लखलखणारं धारदार पातं सपकन् ज्योतिषाचं शिर क्षणार्धात धडावेगळं करून गेलं. सारे त्याच्या या कृतीने आवाक् झाले.

तेव्हा शांतपणं वजीर म्हणाला, ''क्षमा असावी महाराज. पण ज्या माणसाला स्वतःचा मृत्यू केव्हा आहे हेच कळत नाही तो दुसऱ्याच्या मृत्यूविषयी कसं सांगू शकतो हेच मला पटवून द्यायचं होतं. जी माणसं स्वतःचं भविष्य जाणू शकत नाहीत ते दुसऱ्याचं भविष्य काय जाणणार. म्हणूनच त्यांना दुसऱ्याच्या आयुष्यात लुडबुड करायचा अधिकारच काय ?''

वजिराचं बोलणं राजाला पटलं. आपली चूक उमगली. नंतर तो खूप वर्ष सुखानं राज्य करून मेला.

कळलं का तुला या गोष्टीवरनं काही ? की अजूनही शकुन-अपशकुनांच्या गोष्टी तुझं आयुष्य व्यापून राहणार आहेत ?

◆



एका आश्रमात यज्ञ सुरू होता. यज्ञात वेगवेगळ्या पदार्थांच्या समीधा, ऋषीगण उच्चारवाने मंत्रोच्चार करून अर्पण करीत होते. ते चौकोनी अग्नीकुंड आता चांगलंच धगधगत होतं.

त्याचं तेज आणि सौंदर्य पाहून एक माकड त्यावर इतके लुब्ध झाले की, ते यज्ञकुंडाजवळ गेले. गुडघे टेकले आणि त्या अग्नीला आलिंगन देण्यास सिद्ध झाले.

ही मर्कटलीला पाहून एक ऋषी म्हणाला, ''बाबारे, तू ह्या अग्नीजवळ जाशील तर हा अग्नी तुला जाळून खाक करील.''

त्यावर माकड म्हणाले, ''असं असेल तर हा मोहक पण भयंकर पदार्थ का बरे निर्माण झाला असेल ?''

''प्रत्येक पदार्थाचे काही गुण आणि दोष असतात. अग्नीमध्ये प्रचंड उष्णता असते. ती उष्णता जर काबूत आणली तर त्याच्यासारखा उपकर्ता नाही.''

''ते कसं ?'' माकडानं विचारलं.

''आता बघ. अग्नीच्या उष्णतेमुळे माणसाला अन्न शिजवता येते. थंडीत ऊब निर्माण करता येते. वेगवेगळी यंत्र चालवता येतात. पण केव्हा ? जेव्हा हा अग्नी माणसाच्या काबूत असेल तेव्हाच. हेच बघना, या यज्ञातला अग्नीसुद्धा कसा उबदार वाटतोय ते. पण हाच अग्नी जर काबूत नसेल तर त्वरित आपला प्रताप दाखवतो. जंगलात वणवे लावतो. गावच्या गावं बेचिराख करतो. एवढंच काय पण तो काबूत असतानाही त्याच्याशी जादा सलगी केली तर ते संकटालाच आमंत्रण ठरतं म्हणून लक्षात ठेव की, पाणी, वीज आणि अग्नी हे तीन असे आहेत की, त्यांचा दुधारी शस्त्राप्रमाणे उपयोग करता येतो. सदुपयोग केला तर त्या माणसाच्या हितास कारण होतात आणि दुरुपयोग केल्यास त्याच माणसांच्या नाशास कारणीभूत होतात.

◆





# २२. दोन विळे

एका स्वयंपाकघरात दोन विळे शेजारी शेजारी उभे होते. त्यापैकी एकाची मूठ तुटल्यामुळे तो निरुपयोगी बनला होता. म्हणून त्याचा वापर स्वयंपाकघरात होत नव्हता. तो तसाच पडून होता. नुसतेच पडून राहिल्यामुळं त्या विळ्यावर गंज चढायला सुरुवात झाली होती. तो तांबडा दिसायला लागला होता. दुसरा विळा मात्र नेहमीच वापरात असल्यामुळं तो मात्र लखलखीत होता.

एकदा गंजलेला विळा स्वच्छ विळ्याला म्हणाला, ''दादा दुसऱ्यांसाठी तुला सदोदित काम करावं लागतं. किती झिजतोस तू घरच्यांसाठी! आणि याचे बक्षिस काय तर ते तुला निसण्याच्या दगडावर अधनंमधनं तुझ्या अंगाची आग होईपर्यंत घासतात. याचेच मला वाईट वाटते. तेच माझं पाहा, मी कसा मस्त आरामात उभा असतो. ना कसलं काम ना घासण्याचा त्रास.''

त्यावर तो स्वच्छ विळा म्हणाला, ''तू माझी कीव करतोस ते ठीक आहे. पण मला त्यातच आनंद वाटतो. अनेकांच्या उपयोगी मी पडतो. या विचारानेच मला मूठभर मास चढते. लोकांच्यासाठी संतांच्या विभूती असं म्हटलेलंच आहे. स्वत: झिजून लोकांच्या उपयोगी पडणं म्हणजे जीवन सार्थकी लागणं. माझं जीवन असं कुणासाठी तरी सर्मपित होतय यातच मला आनंद आहे. आता मला दगडावर घासतात हे खरंच पण त्यामुळं लोकांच्या उपयोगी पडण्याचं माझं सामर्थ्य उलटं वाढतंच. कारण मला तुझ्यासारखा गंज चढत नाही.''

''पण गंज चढला तर बिघडलं कुठं? उलट त्यामुळं काही काम न करता आरामात राहता येत नाही का?''

''आरामात तू राहू शकतोस हे खरंय; पण तुझ्या आळसामुळंच तुला हा फुकटचा डौल आहे. हे कळत नाही.''

''मी तर तुला सहानुभूती दाखवतोय आणि तू मला बेगडी, आळशी म्हणतोस?''

''तसं नाही रे, मी काय म्हणतोय ते नीट समजून घे. तू अन् मी दोघेही लोखंडाचे आहोत. आपण जर स्वस्थ आळशासारखे राहिलो तर वातावरणातील ऑक्सिजनबरोबर आपली ताबडतोब क्रिया सुरू होते आणि आपलं लोखंडाच्या ऑक्साईडमध्ये रूपांतर होतं. म्हणजेच आपण गंजतो. आता तू गंजलायस ना तसा. त्यामुळं होतं काय की हळूहळू आपलं अस्तित्व नाहीसं होवू लागतं आणि शेवटी आपल्या दणकट शरीराचा भुगा होतो. ही क्रिया एवढी सावकाश होते की, आळसात लोळून आपणच आपलं मरण जवळ आणतोय हे देखिल कळत नाही. तेव्हा आता तूच ठरव आळसात वेळ घालवायचा की, घरमालकाला सांगून मूठ बसवून पुन्हा कामाला लागायचं का ते. दगडावर घासून घेणं हे गंजाला दूर ठेवणारं असतं. त्यामुळं थोडा त्रास झाला तरी भविष्य सुखकर असतं हे निश्चित.

◆



# २३. समुद्रकिनाऱ्यावरील प्रवासी



एका निर्जन बेटावर दोन प्रवासी अडकून पडले होते. बेटावर भरपूर कंदमुळे आणि फळझाडे असल्यामुळे त्यांची खाण्यापिण्याची चंगळ होती. एवढंच काय पण कालवं, मासे, खेकडेही त्यांना भरपूर मिळत.

एवढं सुखी जीवन असूनही त्यांना आपल्या घरच्या माणसांची ओढ लागलेली होती म्हणून ते नित्यनेमाने सकाळ, दुपार, संध्याकाळ किनाऱ्यावर येऊन समुद्रात दूरवर दृष्टी टाकायचे. एखादे गलबत जवळपास आहे का म्हणून माना उंच करून करून नजर फिरवायचे. पण त्यांची निराशाच व्हायची. तरीही त्यांचा शोध दररोज चालू राहायचा. आशा वेडी असते म्हणतात ना. खरं तर या वेड्या आशेवरच ते निर्जन बेटावर जगत होते की, एक ना एक दिवस एखादे गलबत येईल आणि आपली सुटका करील.

एके दिवशी ते असेच किनाऱ्यावर येऊन बसले असता, त्यांना समुद्रात दूरवर एक काळा ठिपका दिसला. त्याच्या आकारावरून त्यांना वाटले की, तो बहुतेक देवमासा असावा म्हणून ते पुन्हा गप्पा मारत बसले.

थोड्या वेळाने तो ठिपका जसजसा जवळ येत गेला त्यांना तो मोठा दिसू लागला. आणि त्यांना वाटले की ही तर एक मोठी होडीच आहे. म्हणून ते त्या होडीतील माणसांचे लक्ष वेधण्यासाठी हाका मारत किनाऱ्यावरनं सैरावैरा धावत सुटले. ओरडून ओरडून घसा सुकला तरी काही प्रतिसाद येईना म्हणून निराश होऊन ते गप्प झाले. ती होडी (?) किनाऱ्याजवळ येतच होती. पण ती होडी किनाऱ्याच्या अगदी जवळ आली तेव्हा पाहतात तो काय ते एकप्रकारचे काळ्या रंगाचे गवत

होते.

ते पाहून त्यातील एक माणूस म्हणाला, ''दुसऱ्या वस्तूची किंवा माणसाची नुसती नावे पाहून त्याच्या संबंधाने आपला जो ग्रह होतो तो त्या वस्तू किंवा ते लोक प्रत्यक्ष पाहिल्यावर बदलतो.''

त्यावर दुसरा माणूस उत्तरला, ''तू म्हणतोस ते अगदी खरे आहे. दुरून डोंगर साजरे-गोजरे दिसतात हेच खरे. पण आपले डोळे असे का फसतात हे तुला माहिती आहे का ?''

''नाही कारण सांगशील ?''

''त्याचं काय आहे बघ की, दूरच्या वस्तूचा आपल्या डोळ्यांशी होणारा कोन लहान असतो म्हणजे कमी मापाचा होतो. त्यामुळे ती वस्तू लहान दिसते. तर जवळ आलेल्या त्याच वस्तूचा आपल्या डोळ्याशी होणारा कोन मोठा म्हणजे जास्त मापाचा असतो म्हणून तीच वस्तू जवळ आल्यावर मोठी दिसते.''

''हो रे हो! तसंच काळ्या गवताबाबत घडलं बघ आपलं. दुरून लहानसा ठिपका वाटला तर जवळ आल्यावर गवताचा पुंजका आणि म्हणूनच बरं का डोंगरावरून पाहिलं असता, दरीतली झाडं इटुकली पिटुकली दिसतात आणि दरीत पोहोचल्यावर....

नेहमीप्रमाणे पहिल्याचं वाक्य पूर्ण करीत म्हणाला, यावरून मला एक विनोद आठवला बघ.''

''कोणता रे ? जलदी सांग.''

एका महाकंजुष माणसाला इमारतीच्या अकराव्या मजल्यावरून खाली पाहताना रस्त्यावर एक चार आण्याचं चकचकीत नाणं दिसलं. ते घेण्यासाठी तो जिना उतरून खाली यायला लागला. नाणं कुणी उचललं तर नाही ना ते पाहण्यासाठी त्यानं आठव्या माळ्यावरून पुन्हा खाली पाहिले तर त्याला ते नाणं आता आठ आण्याचं दिसलं म्हणून तो खुशीत येऊन धाडधाड जिना उतरायला लागला. खात्री करून घेण्यासाठी त्यानं पाचव्या मजल्यावरून रस्त्यावर नजर फेकली तो काय ते नाणं त्याला एक रुपयाचं दिसलं की, एका दमात तो पाच जिने उतरला आणि रुपयाचं नाणं घ्यायला जमिनीवर धावला. तो काय हायरे कर्मा! ते होते रस्त्यावरच्या ड्रेनेजचे चकचकीत झाकण. नुकतंच म्युनिसिपालटीच्या लोकांनी लावलेले. आता बोल.''



''वाऽऽऽऽ रे पठ्ठे! ये हुईना बात! डोळ्यांशी होणाऱ्या कोनामुळे दूरची वस्तू असते जरी लहान तरी जवळ येता होते महान!''

असं म्हणत दोघेही हसत सुटले. तेवढाच एक विरंगुळा होता त्यांच्या जीवनात, शेवटी परिस्थितीशी जुळवून घ्यायला शिकले होते ते.

◆



# २४. मधमाशी आणि कोळी

एकदा मधमाशी आणि कोळी यांच्यात आपलेच घर कसे सुबक असते, ते तयार करण्यासाठी आपण किती चातुर्य पणाला लावतो यावर वाद झाला. दोघांपैकी कुणीही माघार घ्यायला तयार होईना.

स्वत:चा बडेजाव मिरवित कोळी मधमाशीला म्हणाला, ''माझे घर बांधताना मी त्यात किती विविधता आणतो बघ. कधी एक केंद्रीय वर्तुळाकृती तर कधी बहुभुजाकृती. तू काय नुसतेच षट्कोनाकृती एकच एक साच्याचं घर बांधतेस. या विविधतेमुळेच मी म्हणतो माझ्यात तुझ्यापेक्षा जास्त कौशल्य आहे. असले चातुर्य अख्ख्या दुनियेत तुला कुठेही मिळायचे नाही आणि त्यातही विशेष गोष्ट अशी की, माझे जाळे बांधण्यासाठी मी कुठलाच पदार्थ बाहेरून आणत नाही. मला लागणारे सारे सामान माझ्या पोटातूनच निघते. माझ्या उदराच्या टोकाशी रेशीम धागे निर्माण करणाऱ्या छिद्रांच्या तीन जोड्या असतात. जाळे बांधताना या छिद्रातून सतत चिकट द्रव बाहेर फेकला जात असतो. तो वाळला की त्याचे तंतू बनतात. प्रथम तीन टोकांच्या आधारावर झाडांच्या पानांना अथवा भिंतीच्या कडांना धागे चिकटवल्यावर त्रिकोण करून त्याला वाढवत वाढवत बहुभुजाकृती जाळे तयार करतो मी. मग या जाळ्याला आधार देण्यासाठी मी केंद्राकडून टोकाकडे धागे टाकत जातो. आहे की

नाही माझी किमया!''

मधमाशीची प्रतिक्रिया आजमावण्यासाठी तो कोळी क्षणभर थांबला अन् पुढे म्हणाला, ''नाही तर तू, सगळ्या जातीच्या फुलझाडांपासून तुझ्या घराचं सामान चोरावं लागतं तुला. अगदी जंगली फुलातील मधसुद्धा चालतो तुला.''

यावर मधमाशी म्हणाली, ''कोळी दादा, फुलातून नुसता मध काढण्यात तेही त्यांच्या नकळत, त्यांना कुठलीही इजा न पोहोचता! किती कौशल्य लागत असेल याचा जरा विचार कर. दुसरे असे की, पोळे बांधण्यासाठी लागणारे मेण काही मी बाहेरून आणत नाही. तर ते माझ्या अंगावरच तयार होत असते. शरीरावरचे तयार झालेले हे मेण मी पायांनी खरवडून काढते आणि ते थापून माझे पोळे तयार करते. आता तू म्हणतोस तसे ते फक्त षटकोनीच असते हे खरे आहे. कारण मला आहेत सहा पाय. या सहाही पायांनी मेण पाय पसरून थापावे लागते तेव्हा त्यांचा षटकोनच होणार नाही काय? ह्या मेणात मग मी मध आणून आमच्या अन्नाचा साठा करते. त्यासाठी शिकार जाळ्यात येवून अडकण्याची वाट बघावी लागत नाही. मग मी नेहमीच उद्योगी राहते. कण करते. माझ्या मेणाचा फायदा असा की, मेणात मधाचे शोषण होत नाही आणि मेण पाण्यात ओलेही होत नाही. त्यामुळं मध पावसाळ्यातही सुरक्षित राहतो.''

एवढे बोलून मधमाशीनं कोळ्याकडं पाहिलं. कोळ्याच्या चेहऱ्यावर अजूनही गर्व दिसतच होता. मधमाशी पुढं बोलू लागली, ''सर्वात महत्त्वाचं म्हणजे तुझं घर तू शिकारीसाठी वापरतोस पण आमचं घर अन्न-पोषणासाठी असतं. आम्ही गोळा केलेल्या मधाचा आणि मेणाचा लोकांना किती उपयोग होतो. तुझं जाळं मात्र लोकांना अडचणीचंच वाटतं म्हणून ते एका फटकाऱ्यात त्याला नाहीसं करून टाकतात. तुला मी कमी लेखतेय असं समजू नकोस. खरं तर आपण दोघेही आपापल्या परिने चतुर आहोत. फरक एवढाच आहे की, ज्या भावनेनं आपण एखाद्या गोष्टीचा विचार करतो त्याप्रमाणं ती आपल्याला चांगली वा वाईट दिसते हा आपल्या दृष्टिकोनातला फरक असतो.''

कोळ्यालाही मधमाशीचं म्हणणं पटलं आणि ते दोघेही समजूतदारपणं आपापल्या कामाला लागले.

◆



# २५. कासवाची गोष्ट



एक लहानसे तळे होते. त्या तळ्याकांठी चार घरांची वस्ती होती. त्या तळ्यात एक कासव राहत असे. वस्तीतील लहान मुलं पोहोताना बघून त्याला गंमत वाटत असे. नवीन पोहायला शिकणारी मुलं पाठीवर डबा अडकवून तरंगत तेव्हा त्या कासवाला आपले भाऊबंदच पोहोताहेत असं वाटे.

खंड्या पक्षाची तर कासवाला मजाच वाटायची. कधीही खंड्या पक्ष्याचा नेम चुकायचा नाही. त्याला उडताना आणि सूर मारताना पाहून कासवाला सतत वाटत राहायचं. 'आपल्याला असं पक्ष्यासारखं उडता आलं तर किती बहार येईल. आपणही असा सूर मारू शकू.'

आकाशात उडणं हे कासवाचं स्वप्न होऊन बसलं. त्यांनं त्याचा ध्यासच घेतला. शेवटी त्याने मनाशी काही एक ठरवलं. तो संधीची वाट पाहू लागला.

अखेर एके दिवशी त्याला हवी तशी संधी चालून आली. एक गरुड तळ्यावर पाणी प्यायला आला. तेव्हा कासव त्याला म्हणाला, ''नमस्कार गरुड महाराज. मी तुझीच वाट पाहत होतो.''

त्यावर गरुडानं विचारलं, ''कारे बाबा ?''

''तुम्ही खरेच भाग्यवान आहात. आकाशात भरारी मारून तुम्हाला सारं जग नजरेच्या टप्प्यात आणता येतं. आम्ही बिचारे ह्या तळ्यातच किंवा त्याच्या किनाऱ्यावरच्या जगात फिरत राहतो. खरंच तुम्हाला उडता येतं ही गोष्ट किती चांगली आहे.'' कासव गरुडाची स्तुती करू लागला. पुढं गरुडाला कासव म्हणाला, ''असं बघ तू पक्ष्यांमध्ये सर्वात जास्त बलवान आहेस. तुझी शक्ती प्रचंड आहे.




तेव्हा माझे जे काम आहे ते फक्त तू आणि तूच करू शकतोस. करशील ?''

''आधी काम तर कळू दे.''

''मला तुमच्यासारखं आकाशात उडायचे आहे.''

कासवाचे असले मूर्खपणाचे बोलणे ऐकून गरुड त्याला समजावत म्हणाला, ''वेडा की खुळा तू. अरे, उडायला आमच्यासारखे पंख लागतात. आमच्या शरीरात हवेच्या पिशव्या आहेत तशा पिशव्या लागतात. पिशव्यात हवा भरली म्हणजे हलके होऊन हवेत उडणं अधिक सोपं जातं. तसंच वजन कमी अन् शरीराची काही हाडे पोकळ असावी लागतात. तू तर पडलास प्रचंड वजनदार प्राणी. तुला रे कसे उडता येईल ?''

गरुडाचं समजावणी स्वरूपातलं बोलणे कासवाच्या डोक्यात काही शिरलं नाही तो म्हणाला, ''त्यात काय मोठंसं मी पाण्यात जसं पाय मारून तरंगतो तसंच हवेतही हातपाय हलवीन आणि तरंगेन.''

''अरे बाबा, पाण्यात पाय मारणं वेगळं अन् हवेत तरंगणं वेगळं आहे. तुझ्या पायातील बोटांमध्ये असलेले पडदे पाण्यात पोहोण्यासाठीच उपयुक्त आहेत. हवेत तरंगण्यासाठी नाही. तू बघतोसच ना ती नवीन पोहायला शिकणारी मुलं पाठीवर डबा लावून तरंगतात ते. कारण डब्यात हवा असल्यामुळे त्यांची घनता पाण्यापेक्षा कमी होते आणि ते हलके होऊन पाण्यात तरंगू शकतात. तसंच तुला हेदेखील माहीत आहेना, लोखंडाचा गोळा पाण्यात बुडतो पण त्याला ठोकून चपटा केलेला पत्रा मात्र पाण्यावर तरंगतो. याचं कारण पत्रा जास्त पाणी बाजूला सारतो अन् हलका होतो. तसं तुला हलकं होता येणार आहे का ? तरच तुला उडता येईल. नाहीतर कपाळमोक्ष ठरलाच म्हणून समज.''

कासवाच्या हट्टामुळे आणि अशा घमेंडखोर बोलण्यामुळं गरुडाला कासवाचा रागच आला. त्यानं आपल्या बळकट नख्यांनी कासवाला उचलले. आभाळात खूप उंच नेले आणि हवेत सोडून दिले.

कासव हवेत हातपाय हलवू लागला. पण त्याचा काही उपयोग नव्हता. तो वेगाने खाली येऊ लागला. थोड्याच वेळात तो एका खडकावर येवून आपटला. त्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या झाल्या. त्याला कळलेच नाही आपण केव्हा मेलो ते.





# २६. पणती आणि सूर्य

एका खेडेगावातील लहानशा काळोख्या झोपडीत एक पणती मिणमिणत होती. तिचाच प्रकाश झोपडीभर पसरलेला होता. ती तेलाने भरलेली असल्यामुळे तीची वात तट्ट फुगलेली होती.

पण ती स्वत:च्याच मनाशी म्हणाली, ''बाहेर सूर्य तळपत असून काय उपयोग आहे? झोपडीत काही तो प्रकाशत नाही. झोपडीत जो प्रकाश आहे तो माझ्यामुळेच. सूर्यापेक्षा माझंच महत्त्व जास्त आहे. लोक उगाचच सूर्याची उपासना करतात. मूर्ख आहेत सगळे! आपली किंमत त्यांना कळतच नाही. सूर्य मावळला तरी रात्री माझ्याच प्रकाशामुळे उजेड झोपडीभर पसरतो. मी दिवसरात्र या लोकांसाठी जळत असते. पण हे मूढजन माझी किंमत करण्याऐवजी त्या सूर्यालाच सकाळ संध्याकाळ नमस्कार करतात. एकदा ह्या लोकांना धडा शिकवलाच पाहिजे.''

बाहेर सूर्याला मावळता मावळता पणतीच्या मनाची घमेंड कळली. तो स्वत:शीच हसला आणि मावळला.

चोहोकडे अंधार दाटल्यावर झोपडीत पणतीचाच काय तो प्रकाश शिल्लक राहील. रात्रीच्या अंधारात पणतीच्या प्रकाशाने झोपडी आणखीनच उजळून निघाली.

पणतीला स्वत:चा आणखीनच अभिमान वाटला. ती स्वत:शी बोलू लागली. ''केवढे माझे कार्य महान! केवढा माझा प्रकाश! केवढा माझा पराक्रम! मी सूर्याची मस्ती उतरवली. मी एवढेसे तेल प्याले तर माझा एवढा सारा प्रकाश पसरला. सूर्याने त्याचे तोंड काळे केले अन् लाजून निघून गेला. उद्या मी आणखीन तेल पिईन. आणखी फुगेन. मग मी सूर्याहून प्रचंड होईन. त्याहून मोठा

प्रकाश पाडीन. चंद्र-ताऱ्यांना लाजवीन.''

असं म्हणत ती भसाभस तेल प्यायला लागली. वातीवर काजळी जास्त धरली गेली. त्यामुळे प्रकाश कमी झाला.

तेवढ्यात तिकडून झोपडीचा मालक आला. त्याला पणतीचे स्वगत बोलणे ऐकू आले. पणतीच्या गर्विष्ठ विचारांची त्याला कीव करावीशी वाटू लागली. तो पणतीजवळ गेला. वातीवर धरलेली काजळी साफ केली. पणतीत तेल ओतले. मग तिला म्हणाला, ''वाती ग, तू आता एकच दिवस जगणार आहेस. तेवढ्यात काय लावायचे तेवढे दिवे लाव. फुका अभिमान करू नकोस.''

''का धरू नये मी अभिमान? रात्री सूर्य येतोय का तुमच्या मदतीला. मीच दिवसरात्र खपते ना तुमच्यासाठी?'' पणतीच्या बोलण्यात अहंकार होता.

''हे बघ, कुणीही आपली पायरी सोडून वागू नये.'' मालक पणतीवर रागवत म्हणाला, ''सूर्याची कसली बरोबरी करतेस. अगं, तुझं अस्तित्व आहे तेसुद्धा सूर्यामुळेच. सूर्य स्वयंप्रकाशित तारा आहे. त्यावर सतत अणुस्फोटाची मालिका चालू असते. त्यातून प्रचंड प्रमाणात उष्णता आणि प्रकाश ऊर्जा निर्माण होते. त्यामुळेच तर पृथ्वीवर जीवन तगून राहिलंय. सर्व वनस्पती- तुझी वात ज्या कापसापासून तयार झालीय त्या कापसाची वनस्पतीसुद्धा सूर्यप्रकाशातच कर्बग्रहणाची क्रिया करून आपलं अन्न तयार करतात. त्यातूनच कापूस तयार होतो. मग त्या कापसाची वात होते. त्या वातीला तेलात भिजवली की केशाकर्षणानं तेल वातीच्या एका टोकाकडून दुसऱ्या टोकापर्यंत पोहोचतं मगच तू पेट घेवू शकतेस. आणि प्रकाश देवू शकतेस. सुरुवातीपासून शेवटपर्यंत तू परावलंबी आणि फक्त परावलंबीच आहेस. तेल संपलं तर तू मरशील. पण सूर्य मावळला तरी नियमित पण पुन: पुन्हा उगवेल. कारण तो स्वयंभू निसर्गाच्या शास्त्रीय नियमाने वागतोय. तुझ्यासारखा गर्विष्ठ होऊन फुगत नाही.''

मालकाचे झणझणीत खरे बोलणे ऐकून पणतीने लाजेने मान खाली घातली. आणि निमूटपणे तेवू लागली.

◆



# २७. बैल आणि चाके



सुगीचे दिवस होते. शेतात पीक तरारून आलेलं होतं. शेतकरीदादा दिवसरात्र शेतात खपत होते. कापणी, मळणीची कामं जोरात चालू होती.

नेहमीप्रमाणेच संध्याकाळ झाली. सूर्यनारायणानेही आपली किरणे आवरती घेतली. अन् डोंगराच्या आड विश्रांतीसाठी गेला. शेतकऱ्यानेही शेतकाम आटोपले. बैल गाडीला जुंपले. अन् घराकडे जायला निघाला.

बैलगाडीवर गवताची रास होती तशीच धान्याची पोतीही होती. गाडी शिगोशिग भरलेली होती. असा हा रोजचाच दिनक्रम होता.

शेतकऱ्याने बैलांना इशारा दिला. बैल गाडी ओढू लागले. त्यांच्या गळ्यातल्या घंटा किणकिणू लागल्या. सांजगीत गावू लागल्या. शेतकरी आनंदानं गाणं गुणगुणत जावू लागला. घंटांच्या संगीत लयीवर त्याचं गाणं गुणगुणणं चालू होतं.

रस्ता शेताडीतला होता. दगडांचा खडबडीत होता. रस्त्यावर धूळही भरपूर होती. बैलगाडीची वाट उंचसखल होती. बैलांना त्या वाटेचा सराव होता. ते गाडी ओढत चालले होते.

श्रम बैलांचेही होते आणि शेतकऱ्याचेही पण बैलगाडीची चाके मात्र कुरकुरत होती. ती सारखी आसाशी घासत होती. खडाक् खुडूक करत चिरका आवाज काढत होती. ओझं वाहून न्यावं लागतंय

म्हणून आवाज काढून चिडचिडत होती. रडत होती.

घंटांच्या संगीतात तो आवाज कर्णकर्कश वाटत होता. साऱ्या संगीत लयीच्या गोडीत माती कालवत होता. नादमाधुर्य विसविशीत करत होता.

चाकांच्या आवाजानं शेतकरी कावला.

तो संतापून चाकांना म्हणाला, ''कसे नालायक आहात रे तुम्ही. बैल विनातक्रार गाडी ओढताहेत. सतत श्रम करताहेत. कष्टाखाली मरताहेत तरी त्यांची तक्रार नाही. आणि तुम्ही मात्र नुसती फिरता तरी एवढी कुरकुर करताय.''

चाके विनवणी करत म्हणाली, ''असं संतापू नका. आमचं म्हणणं जरा ऐकून घ्या. बैल श्रमताहेत तसं आम्हीही ओझं वाहून नेण्याचं काम करतोय. पण बैलांकडे जेव्हा लक्ष तुम्ही पुरवता तेव्हा काही आमच्याकडं तुमचं लक्ष नसतं.''

शेतकरी ह्या आरोपानं आणखीनच वैतागला. तो म्हणाला, ''इथं कोण मरतंय आणि कोण रडतंय. उगाच चोराच्या उलट्या... म्हणजे काय? तुम्हाला नुसता फिरायचाही कंटाळा! अन् म्हणे लक्ष देत नाही आमच्याकडं.''

''मालक जरा ऐकून तर घ्या आमचं म्हणणं.'' असं म्हणत चाके पुन्हा आपली बाजू मांडू लागली. ''तुमच्या दोन हाडांच्या सांध्यात कुर्च्या असल्यामुळे तुमची हाडं कधीतरी कुरकुरतात का? कारण कुर्च्यांमुळं दोन हाडांमधलं घर्षण नाहीसं होतं. ती नेहमी गुळगुळीत राहतात. हो नं?''

''हो. पण त्यांचा काय संबंध तुमच्या कुरकुरण्याशी? उगाच जादा हुशारी दाखवू नका. फुकटच्या गमज्या चालल्यायत तुमच्या.''

''तसं नाही मालक. बैलांना वेळेवर चारापाणी दिल्यावरच ते दररोज कष्टाची कामं करू शकतात. आम्हीही कुरकुरणार नाही. जर तुम्ही आमचं नियमितपणे वंगण- तेलपाणी केलंत तर. बघा नं आसाशी आम्ही संपूर्ण सुकून गेलोय. त्यामुळे गोलगोल फिरताना आम्ही आसावर आपटताहेत, ठेचकाळतोय. त्याचा आम्हाला त्रास होतोय. आम्हाला जर वंगणाचा घास भरवलात तर का बरे आम्ही कुरकुरू? वंगणामुळं आमचं घर्षण कमी होईल. आसावर आम्ही कंचकाळणार नाही. वंगणाच्या बुळबुळीतपणामुळं घर्षण तर थांबेलच. आमचा त्रास तर कमी होईल.''

शेतकऱ्याला चाकांचं म्हणणं पटलं. आपली चूक उमगली. तो त्यांना दिलगिरीच्या स्वरात म्हणाला, ''हे माझ्या लक्षातच आलं नव्हतं. आज घरी गेल्याबरोबर तुम्हाला वंगणाचं सुग्रास भोजन घालतो आणि ह्यापुढेही लक्षात ठेवीन की, वंगण तेलपाण्याची गरज आहे - तुमचं आयुष्य सुखकर होण्यासाठी.''

◆





## २८. बेडूक आणि साप

एका दलदलीने भरलेल्या मोठ्या डबक्यात बेडूक राहत होते. डबकाभर त्यांचंच राज्य होतं. तेव्हा ते डबक्यात मौजेनं इकडून तिकडे अन् तिकडून इकडे अशा उड्या मारीत बागडत डराव डराव करून ओरडून चिखलात लोळत असत. चैनीत दिवस चालले होते. डबक्यात खायला शेवाळ आणि किडेही भरपूर होते.

हे सुख फारच अंगावर आले तसे ते आपापसात म्हणू लागले, जग किती पुढं गेलंय ते आपल्याला या चैनीच्या नशेत कळलंच नाही. आता यापुढं असं बेशिस्त आयुष्य जगायचं नाही. शिस्तीनं वागायला हवं. आपलं राज्य नीट चालायला हवं. पण त्यासाठी एक राजा निवडायला हवा. कुणाला करावे बरं राजा?

राजा होण्यासाठी ते आपापसात भांडू लागले. अगदी हमरीतुमरीवर भांडू आले. तेव्हा त्यांच्यातील एक म्हातारा बेडूक म्हणाला, ''अरे, असं भांडण्यापेक्षा आपण मंडुक सूक्त म्हणून देवाला प्रसन्न करून घेवूया. म्हणजे देवच आपल्याला राजा देईल?''

सगळ्यांना त्याचं म्हणणं पटलं. सारे देवाची आळवणी करू लागले. देव प्रसन्न झाला. 'वर मागा' म्हणाला. बेडकांनी राजा मागितला. देव गमतीनं हसला अन् एक मोठा लाकडी ओंडका डबक्यात टाकला.

देव म्हणाला, ''हा घ्या तुमचा नवा राजा.'' ओंडका पाण्यात जोरात पडला. त्यामुळे मोठा आवाज आला. पाणी जोरानं चौफेर उसळलं. मोठ्या शक्तीचा भास झाला. बेडकांना वाटलं, 'वा




काय शक्तिमान राजा मिळालाय!'

ते दुरून आदरानं त्या ओंडक्याकडे पाहू लागले. थोड्यावेळानं पाण्याचा सळसळाट थांबला. ओंडका चिखलात रुतून बसला. पाण्यात जागा व्यापल्यानं डबक्यातील पाण्याची पातळी थोडीशी वाढली. बेडकांना वाटलं नव्या राजाने आल्या आल्याच डबक्यातलं वाढवलंय. खरंच फारच शक्तिमान आहे हा राजा.

बराच वेळ झाला. हा राजा हालेना की चालेना. बोलेना की बघेना. बेडकांना तर काहीच कळेना. हा काय प्रकार आहे ते हळूहळू धीर करून ते त्याच्याजवळ गेले. हळूच त्याला शिवून बघू लागले. पण प्रतिक्रिया ढिम्म, मग त्यांची भीती चेपली. ते त्याच्यावर चढू लागले. तो आपला दगडासारखा ठिम्म. बेडकांना कळले, देवाने फसवलेय म्हणून.

त्यांनी परत मंडुक सूक्ताचा घोष सुरू केला. देव पुन्हा प्रसन्न झाला. 'काय हवे!' असे क्रोधाने म्हणाला.

बेडकांनी एकच गलका केला. ''आम्हाला दगडासारखा थंड गोळा राजा म्हणून नकोय. हलता बोलता राजा हवाय.''

देव म्हणाला, ''ठिकाय, हा घ्या.'' असं म्हणून त्यानं डबक्यात एक साप भिरकावला.

पाण्यात पडल्याबरोबर साप पाण्यात वळवळ करीत डबकाभर फिरू लागला. सारं पाणी ढचमळू लागला.

हा खरा राजा होता. बेडकांनी मागितला तसा हालचाल करणारा शांतीवान! पण थोड्याच वेळात बेडकांना आपली चूक कळून आली. हा राजा आपली प्रजाच फस्त करू लागला होता. एका मागून एक बेडकं खात सुटला होता. आपल्या राजेपणाचा पुरता अधिकार गाजवू लागला होता.

बेडकांचा काळ आला होता.

तेवढ्यात आकाशातून एक पक्षी डबक्याजवळ आला. सुळकन् पाण्यात सूर मारला. त्याच्या मजबूत भारदस्त चोचीत सापाला पकडला अन् क्षणात उडून गेला. बेडकांना हायसं वाटलं.

मघापासून बेडकांची सारी नाटकं एक मुलगा पाहत होता. बेडूक शेवाळ, किडे खाऊन जगत होते. बेडकांचा झालेला राजा- साप बेडकांनाच खाऊन जगत होता. आणि आता सापाला खाऊन गरुड जगणार होता.

मुलाच्या डोक्यात एकदम प्रकाश पडला. ''अरे ही तर पर्यावरणातील एक अन्नसाखळीच झाली की!'' आश्चर्यानं स्वत:शीच पुटपुटला. ''शेवाळ किडे- बेडूक- साप- गरुड! हे तर अन्नसाखळीचे झाले भारुड!''

शेवटी काय तर 'जीवो जीवस्य जीवनम्' हेच खरं!

◆

# २९. व्यापारी आणि गाढव



एक व्यापारी मिठाचा व्यापार करी. समुद्रावर मीठ स्वस्त मिळत असे, म्हणून तो ते समुद्रावर जाऊन खरेदी करीत असे. तिथून ते मीठ तो घाटावर नेत असे. कारण घाटावर मिठाला चांगला भाव येई. समुद्रावरून घाटावर मीठ वाहून न्यायचं काम त्याचे गाढव करीत असे.

मिठाचं ओझं खूपच जड असे. गाढव घाटातून घाटमाथ्यापर्यंत चढता चढता खूप दमून जात असे. कसेबसे पाय ओढत ओढत तो चढत असे. त्याला या कामाचा खूप कंटाळा येई. या यातनातून सुटावं असं त्याला खूप वाटे. सुटका कशी करता येईल याचा तो विचार करीत राही. पण मार्ग काही दिसत नसे.

असेच दिवस चालले होते. ते एकदा पाठीवर मीठाचे ओझे घेऊन कंटाळत कंटाळत चालले होते. बरोबर व्यापारी होताच. चालता चालता एक ओढा आडवा आला. ओढ्यात बरेच पाणी होते. पण वाहते नसल्यामुळे त्यात शेवाळ दाटले होते. परिणामी खडक गुळगुळीत झाले होते. वाट नेमकी तिथूनच जात होती. ती अगदी निसरडी झाली होती. गाढव वाटेने ओढ्यात शिरले. हळूहळू जपून चालू लागले. तरीही त्याचा पाय निसरड्या वाटेवर घसरलाच. धपकन् ते पाण्यात पडले. त्याच्यावरच्या साऱ्या मीठाच्या गोणी पाण्यात भिजल्या. त्यातील मीठही भिजून गेले. अर्थातच मीठ पाण्यात विरघळून गेले. गाढव कसेबसे सावरत उभे राहिले. पाठीवरचे ओझे हलके झालेसे त्याला वाटू लागले. गाढवाला मुका मार बसला होता. पण त्या दुःखापेक्षा त्याला आनंदच झाला पाण्यात पडण्याचा. कारण त्याच्या पाठीवरचे मीठ पाण्यात विरघळून गेले होते आणि ओझे संपले होते.

गाढवाला ही चांगलीच युक्ती सापडली होती. मीठ पाण्यात विरघळते हे त्याला कळले होते.

समुद्रावर व्यापाऱ्याने नवे मीठ घेतले. पुन्हा गोणी मिठाने भरल्या. त्या गाढवाच्या पाठीवर लादल्या आणि परत त्याच वाटेनं घाटाकडे चालू लागला.

आता मात्र गाढव आनंदात ओझे घेऊन चालले होते. कारण त्याला युक्ती माहीत होती. पुन्हा

वाटेत ओढा आला. गाढव थकले होते तरी आनंदाने ओढ्यात शिरले. तरातरा चालायला लागले. पाण्यातून वाट निसरडीच होती. मुद्दाम घसरून पडले. पाण्यात अगदी पार उताणे होऊन पुन्हा सारे मीठ पाण्यात विरघळून गेले. गाढवाच्या पाठीवरचे ओझे पुन्हा संपले.

यावेळी व्यापाऱ्याचे नीट लक्ष होते गाढवावर. त्यानं ओळखलं की, गाढवानं हे सारे मुद्दाम केलेय त्याच्या पाठीवरचे ओझे कमी करण्यासाठी. माझं अतोनात नुकसान केलेय. त्याला गाढवाचा रागच आला. तेव्हा तो मनात म्हणाला, ''याला मी नीट धडा शिकवीन.''

म्हणून तो परत मागे वळला. पुन्हा समुद्रावर गेला. पण मीठ घ्यायला नाही. त्याने गोण्यांमध्ये सागरकिनारी असलेली वाळू भरली. त्या वाळूची भारंभार पोती त्यानं गाढवाच्या पाठीवर लादली. आणि पुन्हा घाटावर जायला निघाला.

गाढवाला कसलीच काळजी वाटत नव्हती. ओढ्यात पोहोचल्यावर तो घसरून पडणार होता. पाठीवरचे ओझे संपणार होते.

चालता चालता वाटेत पुन्हा तोच ओढा आला. गाढवाला केव्हा एकदा ओढ्यात पाऊल टाकतोय असं झालं होतं. तो तरातरा ओढ्यात पडला. दोन्ही बाजूंनी गडाबडा लोळला. व्यापारी हे सारे काठावरून पाहत होता अन् मनातल्या मनात हसत होता गाढवाच्या गाढवपणावर.

इतके मनसोक्त उताणं पडून झाल्यावर गाढव उठू लागले. पण काय! त्याला उठताच येईना.

वाळूत पाणी शिरून ती पार भिजली होती. त्यामुळे आणखीनच जड झाली होती. गाढवाच्या पाठीवरचे ओझे पूर्वीपेक्षा वजनाने खूपच वाढले होते. गाढवाने उठायची खूप धडपड केली. पण त्याला भिजलेल्या वाळूच्या वजनामुळे उठता येईना. त्याच्या नाकातोंडात पाणी जाऊ लागले. तो जीवाच्या आकांताने उठण्यासाठी धडपडू लागला तेव्हा व्यापारी त्याला म्हणाला, लक्षात ठेव, मीठाप्रमाणेच सगळे पदार्थ पाण्यात विरघळणारे नसतात. आणि वाळूसारखे जे पदार्थ पाण्यात विरघळत नाहीत ते पाणी शोषून घेतात. त्यामुळे त्यांच्या वजनात वाढ होते. मीठ विरघळवून तू मोठेच नुकसान केलेस माझे. तेव्हा तुला धडा शिकवण्यासाठी थोडेसेच विज्ञान शिकवावे लागले मला. अच्छा तर आता! मर इथेच नाही तरी मला काय कामाचा.'' असं म्हणत व्यापारी आपली वाट चालू लागला आणि गाढवं नाकातोंडात पाणी जाऊन मरून गेले.

तात्पर्य काय अर्धवट विज्ञान माहिती असेल तर ते अंगाशी येते. अन् गाठ प्राणाशी पडते.

◆



